निघाले शारदाविलाच्या किंवा स्वर्देवी
बालरवीचें लग्न उषेशीं पाळण्यांत लावी?

पृथ्वीवरल्या नको कवींचें ‘गायन’ ऐकाया
म्हणुनि त्यांस कीं पाठविती सुर हा शेंदुर प्याया?

क्षणोक्षणीं स्वर्गांत मारिती कवी फेरफटका
धोक्याचा टांगला तयास्तव द्वारीं कंदिल का?

संन्याशांची वार्षिक परिषद किंवा ही भरली
दाटी झाली गगनीं भगव्या छाट्यांची सगळी?

स्वर्गीतिल मल्लांची चाले कीं जंगी कुस्ती
आखाड्यांतिल लाल धूळ का उधळे ही वरतीं?

‘सुरते’चा[1] संग्राम चालला देवदानवांत
त्यांत कुणावर कुणी ‘पुणेरी’ भिरकावुनि देत?

‘लाल बावटा संघा’चे कीं जमले वेताळ
करिती भांडुनि परस्परांचीं वदनें बंबाळ?

‘आकाशाच्या बापा’ची कीं मुक्तिफौज[2] सुटली
लालभडक झोंकांत तयांची झगमगती डगलीं?

कुणी पुण्याच्या सभेंत खाई मार ‘देशभक्त’
पगडीची वावडी तयाच्या चढली गगनांत?

कानडवादें[3] बेळगांवची उडे लाल माती
वातावरणीं तशीच कोंदुनि अजुनि बसे का ती?

१. मागें ‘सुरत’च्या कॉंग्रेसमध्यें झालेल्या देशभक्तांच्या ‘जोडाजोडींत’ ‘पुणेरी जोड्या’चा प्रामुख्यानें उपयोग झाला असल्यानें त्याला राष्ट्रीय महत्त्व आलें हें सांगावयास पाहिजे काय? २. पहा : योहान्न ७: ३९. ३. कानडी-मराठी-वाद.

'कंपनीं 'तला[1] मखमालीचा कुठल्याशा पडदा
इथें पसरुनी काय ठेविला लिलांवास उघडा ?

आजवरी नासती तांबडा रंग प्रेमवेडे
भांडवलावर त्या काढी कुणि दुकान 'घोरपडे' ?

कीं रात्रीं उधळती रंग जे लक्ष्मीचे लाल
तेच विलसती नभीं घेउनी मूर्त रूप लाल ?

प्रेमावरचें लिखाण जमवुनि कीं विश्वामधलें
कल्याणास्तव कुणीं जगाच्या येथें पेटविलें ?

अरुण असे का जिवंत हा ? कीं गतप्राण झाला
कुणा कवीनें खून तयाचा निजकवनें केला ?

थकलों आतां ! ! उत्प्रेक्षांची संपत ये कंथा
मान लचकली म्हणतां म्हणतां ही लांबट संथा !

काव्य मरूं दे ! शब्द झरूं दे—अरुण तडफडूं दे ?
चहा चालला सकाळचा हा निवुनि पार इकडे !

अहा ! माझिया कपांत असतां अरुणाची लाली
वाहुं कशाला शब्दांची त्या अरुणा लाखोली ?

नको भटकणें अरुणासाठीं उगाच स्वर्गांत
स्वर्ग भेटवी अरुणरसाचा या एकच घोंट !

आणि शारदे, जरी आरुणी पेय न हें मिळतें
तरी मंदिरीं तुझ्या क्षणभरी कोण बरें फिरतें[2] ?

१. नाटक-मंडळीच्या पडद्यांचा लिलांव झाल्याशिवाय कोणत्याही नाटक मंडळीच्या आयुष्यावर पडदा पडावयाचा नाहीं हें सुप्रसिद्धच आहे. २. हल्लींच्या 'ज्युबिली'च्या सांथींत या पन्नास कवितांनीं 'अरुणा'चीं अनायासेंच ज्युबिली साजरी होत असल्याची कोणा वाचकाची समजूत झाल्यास कवीला फार आनंद होणार आहे.

# सारंगीवाला

कलेवरील निरपेक्ष प्रेमानें वाजविलेली सारंगी मनास मोह घालते. जीवनाच्या कलहांत तिचा शस्त्रासारखा उपयोग केल्यास कलेसह तिचा नाश होतो. हा अप्रिय अनुभव पुण्याच्या रस्त्यांतून रात्रीच्या वेळीं सारंगीची सुरावट छेडीत जाणाऱ्या एका सारंगीवाल्यानें आम्हांस दिला. कांहीं कविमित्रांनीं त्याला उद्देशून रचिलेल्या गौरवपर गाण्यानें आधींच आतुर झालेली रसिकता विरस पावतांच त्याच सुरावर निराशेचें गाणें गाऊं लागावी हें साहजिकच आहे. खालील कडव्यांत सांप्रदायिक कल्पनेच्या कल्पित माधुरीपेक्षां अनुभवाचा कडवटपणा विशेष आढळेल. पण त्याला इलाज नाहीं. त्यांतही एक प्रकारची रुचि आहे.

थांबीव एकदां सारंगी ही चल जा, येथुन दूर ! ॥ ध्रु० ॥

काम करुनी देह थकला,  
प्राण अगदीं कंठिं आला,  
शेजेस पाठ ना कुठें लागली, तोंच निघे तव सूर.

गुंतला हा जीव आधीं,  
गुंतवाया त्यास नादीं,  
निवडून वेळ तूं अचुक काढिशी, दिसशी खूप चतूर.

जीवनाची रागदारी,  
ऐकुनीयां ये शिसारी,  
या विटल्या कानीं संगीताची आतां कुठुन जरूर ?

कांपऱ्या या घेशि ताना,  
डोलवीशी आणि माना,  
दाविशी कराची सहज सफाई, गज चाले चौखूर !

फिरति तारांवरुनि बोटें,  
नाद वरचे वरतिं उमटे,  
वाहतें हृदय त्यांतून कुठें ? तें बिदागीस आतूर ?

आग पेटे आंत पोटीं,
शांतता ही वदनिं खोटी,
हे सूर कशाचे ? जळजळीत हा लोहरसाचा पूर.

आंतड्याच्या पिळुनि तारा,
काढशी या गीतधारा,
ऐकून भयानक राग तयाचा हंसे रात्र भेसूर.

याचनेचा सूर रडका,
त्यास कसला ताल-ठेका ?
घाबऱ्या मनीं उठवितें उलट हें भलभलतें काहूर.

लांकडी हें वाद्य दुबळें
मानवी त्या हेतु न कळे,
नातरी तडकुनी दुभंग होइल खास तयाचा ऊर !

हातिं येतां चार तुकडे,
टाकसी कां वाद्य उपडें ?
करितोस कलेची पोटासाठीं विटंबना मगरूर !

जे हरीचे लाल हौशी,
जीव हळवे कीं विलासी,
जा, तया कुशलता दाव ! तयांचे खिसे खोल भरपूर.

जीव निद्रेमाजि रंगे,
स्वप्नसृष्टींतून गुंगे,
जा, देऊं नको क्षणमात्र जगाची तयासि जाणिव क्रूर.

# प्रेमाचा गुलकंद

— बागेंतुनि वा बाजारांतुनि कुठुनि तरी 'त्या'नें
गुलाबपुष्पें आणुनि द्यावित 'तिज'ला नियमानें !

कशास सांगूं प्रेम तयाचें तिजवरतीं होतें ?
तुम्हीच उकला बिंग यांतलें काय असावें तें !

गुलाब कसले ? प्रेमपत्रिका लालगुलाबी त्या !
लाल अक्षरें जणुं लिहिलेल्या पाठपोट नुसत्या !

प्रेमदेवता प्रसन्न होई या नैवेद्यानें !
प्रेमाचे हे मार्ग गुलाबी जाणति नवतरणे !

कधीं न त्याचा ती अवमानी फुलता नजराणा !
परि न सोडला तिनें आपुला कधिंही मुग्धपणा !

या मौनांतच त्यास वाटलें अर्थ असे खोल !
तोहि कशाला प्रगट करी मग मनांतले बोल !

अशा तऱ्हेनें मास लोटले पुरेपूर सात,
खंड न पडला कधीं तयाच्या नाजुक रतिव्रांत !

अखेर थकला ! ढळली त्याची प्रेमतपश्चर्या,
रंग दिसेना खुलावयाचा तिची शांत चर्या !

धडा मनाचा करुनि शेवटीं म्हणे तिला, "देवी !
( दुजीं आणखी विशेषणें तो गोंडस तिज लावी. )

"बांधित आलों पूजा मी तुज आजवरी रोज !
तरि न उमगशी अजुनि कसें तूं भक्तांचें काज ?

गेंद गुलाबी मुसमुसणारे तुला अर्पिलेले
सांग तरी सुंदरी, फुकट का ते सगळे गेले ?"

तोंच ओरडुनि त्यास म्हणे ती, "आळ वृथा हा कीं !
एकही न पाकळी दवडली तुम्ही दिल्यापैकीं !"

असें बोलुनी त्याच पावलीं आंत जाय रमणी
क्षणांत घेउनि ये बाहेरी कसलीशी बरणी !

म्हणे, "पहा मीं यांत टाकले ते तुमचे गेंद,
आणि बनविला तुमच्यासाठीं इतुका गुलकंद !

कशास डोळे असे फिरवितां कां आली भोंड ?
बोट यांतलें जरा चाखुनी गोड करा तोंड !"

क्षणैक दिसलें तारांगण त्या,-परी शांत झाला !
तसाच बरणी आणि घेउनी खांद्यावरि आला !!

"प्रेमापायीं भरला" बोले, "भुर्दंड न थोडा !
प्रेमलाभ नच ! गुलकंद तरी कशास हा दवडा ?"

याच औषधावरी पुढें तो कसातरी जगला,
हृदय थांबुनी कधींच नातरि तो असता 'खपला' !

तोंड आंबलें असेल ज्यांचें प्रेमनिराशेनें
'प्रेमाचा गुलकंद' तयांनीं चाटुनि हा बघणें !

## कानगुजलां[1]

तो आला जवळी नि कानगुजला कांहींतरी हांसुनी,
तों शेजारिल मांजरावर तिनें भिर्कावली फुंकणी !
"जा–हिंडा–सगळ्या सभा समजल्या ! आहे तुम्हांला मुभा !
सांभाळीत घरांत मात्र बसुं का मी कारट्यांच्या सभा ?"

तो आला जवळी नि कानगुजला कांहींतरी हांसुनी,
तों पोळीवर ओतुनीच उठली रागामधें फोडणी !
"जा आणा दुसरी खुशाल नटवी कोणी ! पहा नाटकें !
येऊं का तुमच्याबरोबर असें नेसून मी फाटकें ?"

तो आला जवळी नि कानगुजला कांहींतरी हांसुनी,
पोतेरें दिधलें तिनें तडक तों भिंतीवरी फेकुनी !
"सारे कागद जा चुलींत खुपसा ! दावूं नका वाचुनी !
आंघोळीपुरतें निघेल तुमच्या पाणीं तरी तापुनी !

तो आला जवळी नि कानगुजला देऊन कांहींतरी,
तों आलिंगुनि ती म्हणे, "करविल्या केव्हां कुड्या या तरी !"

१. 'ते आले जवळी नि कानगुजले'—माधवी (नाशिक)

## पत्रें लिहिलीं पण....?

तूं आलीस बघावया सहज 'त्या[१]' देवालयीं 'गालिचे'
होतों चोरुनि अंग मीहि घुसलों त्या गोड गर्दीमधें !
तूझें दिव्य अहा, न म्यां निरखिलें लावण्य जों गालिचें—
तों डोळ्यांपुढुनी पसार कधिं तूं झालीस विद्युल्लते ?

तूं गेलीस ! ! मनांत अन् कसकसें वाटूं मला लागलें !
यावें अंगिं भरून हींवच जसें पित्तप्रकोपामुळें !
माघारीं फिरलों तसाच धरुनी मी गच्च डोकें तदा,
(कोणी बांधिति कांहिं तर्क !) पडतां वाटेंत मी चारदां !

तेव्हांपासुनि मी तुझी करितसें टेहेळणी सारखी
बागा, पाणवठे फिरून दमलों—देवालयें धुंडिलीं !
उद्देशून तुला कितीक रचिलीं काव्यें तशीं मासिकीं,
'व्यक्ति–स्तांभिं'[२] हि जाहिरात कितिदां पत्रांतुनि म्यां दिली !

पत्रें आजवरी तुला खरडलीं त्यांचीं पहा बंडलें—
येथें बांधुनि ठेविलींत !—पण तीं धाडूं कुठें प्रेमले ?

१. म्हणजे रामेश्वराच्या, देवळांत हें दर्दी पुणेकरांना सांगावयास पाहिजे क
२. Personal Column.

## मनाचे श्लोक

रामदासी साहित्यांतून नांवापुरती उसनवारी करतांना रामदासी वृत्तीचाच अंगीकार केला असल्यानें समर्थांचिये सेवकांनीं वक्रदृष्टि करून पहाण्याचें कारण नाहीं. सांप्रदायिक 'मनाच्या श्लोकां'च्या मालिकेंत गोंवून घेण्याचें सामर्थ्य या 'मनाच्या श्लोकां'त नाहीं व तशी आकांक्षाही नाहीं. मात्र हे श्लोक निव्वळ मनाचेच आहेत, असें समजूं नये. हें तो प्रचीतीचें बोलणें आहे!

मना, नीट पंथें कधींही न जावें,
निशापाणि केल्याप्रमाणें चलावें,
जरी वाहनें मागुनी कैक येती
कधीं ना तरी सोडिजे शांतवृत्ती!

दुकानांवरी लाविल्या लांब पाट्या
मना, थांबुनी वाच रे वाच बा त्या!
अकस्मात् दिसे जाहली जेथ गर्दी
तिथें चौकशी जा करायास आधीं!

तिऱ्हाईत कोणी जरी जाय पंथें
तरी रोंखुनी पाहणें त्याकडे तें!
अहा, अंगना त्यांतुनी ती असेल
वळोनी तरी पाहिं मागें खुशाल!

कधीं आगगाडींतुनी हिंडतांना,
सिनेमा—तमाशे तसे पाहतांना,
विचारी मना, त्वां न खर्चीत जावें,
सदा श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें!

कधीं 'मंदिरीं' जासि वाचावयाला
तरी इंग्रजी मासिकीं ठेव डोळा!
कुठें छान चित्रें कुठें 'कूपनें' हीं
दिसे सर्व तें नीट कापून घेईं!

कुणाचेविशीं अंतरीं होय तेढ,
निनांवी तया धाडिं रे 'नॉटपेड'!
तयाचेनि नांवावरी लट्ठ व्ही. पी.
मना, मागवीं— त्याहुनी रीत सोपी !

सदा खाद्यपेयावरी हात मारीं
बिलें देइं सारून मित्रासमोरी;
"अरेरे, घरीं राहिले आज पैसे—"
खिसे चांचपोनी मना बोल ऐसें !

कुणाच्या घरीं जा करायास दाढी,
कुणाची फणी घेउनी भांग काढीं ?
कुणाचा 'स्वयंटाक' टाकीं खिशांत,
घड्याळेंहि बांधीं तशीं मनगटांत !

कुणाच्या विड्या नित्य ओढीत जाव्या,
तशा आगपेट्याहि लंबे कराव्या !
चहा होतसे केधवां पै कुणाचा
अरे मन्न, घेईं सुगावा तयाचा !

इथें पायगाडी तिथें वाद्यपेटी
इथें पुस्तकें वा तिथें हातकाठी;
अशी सारखी भीक मागीत जावें,
स्वतांचें न कांहीं जगीं बाळगावें !

कुणाचें असे मागलें कांहिं देणें
कपर्दीकही त्यांतली त्या न देणें
कधीं भेटला तो तरी त्या हंसोनी
म्हणावें "असे सर्व तें नीट ध्यानीं !—"

कुणाचें कधीं लागलें पत्र हातीं
कुणाची तशी चिट्ठि किंवा चपाटी;

तरी त्यांतल्या वाचणें चार ओळी,
न ठावें कळे कोणतें काय वेळीं !

जिथें चालल्या खाजगी कानगोष्टी
उभीं आणि धेंडें जिथें चार मोठीं,
मना, कान दे तोंड वांसून तेथें,
पहा लागतो काय संबंध कोठें !

कडी लागलेली दिसे आंत जेथें,
मना सद्‌गृहस्था, त्वरें जाय तेथें !
जरी पाहसी आंत ना काक-अक्षें,
कशाला तरी त्या फटी अन् गवाक्षें ?

नसे ज्याविशीं ठाउकें आपणांतें,
मना, बोलणें 'दाबुनी' त्यावरी तें !
दुजांचीं जरी जाणशी गुप्त बिंगें
तरी धांव घे वृत्तपत्रांत वेगें !

मना सज्जना, चार आण्यांत फक्त
तुला व्हावयाचें असे 'देशभक्त' !
तरी सांगतों शेवटीं युक्ति सोपी,
खिशामाजिं ठेवीं सदा गांधिटोपी !

# कवि[1] आणि कवडा[2]

[एक खरी गोष्ट]

माडीच्या खिडकीमधें कवि कुणी होता सुखें बैसला
'भिक्षांदेहि' करावयास कवडा आला कुणी त्या स्थळा!
"कां हो काव्य नवीन काय लिहितां?" त्यांतें पुसे खालुनी
सांगे नांव कवी; हंसून कवडा हो चालता तेथुनी!

चार दिवसांनीं मासिकांत येई
काव्य (?) कवड्याचें; नांव तेंच त्याही!
रसिक म्हणती, "वा! और यांत गोडी!"
कवी हांसुनि आपुलें काव्य फाडी!

१. कवि=खरा जातिवंत कवि. २. कवडा=भुक्कड शब्दजुळव्या. (कवि या शब्दाचें क्षुद्र रूप...कुत्सितार्थे डात् इति पाणिनी)

# कवीचीं 'विरामचिन्हें'

मानवी जीवनलेखांतील गोविंदाग्रजांनीं दर्शविलेल्या 'विराम–चिन्हां-' पेक्षां कवीच्या आयुष्यांतील 'विरामचिन्हें' निराळीं असावींत ही गोष्ट हल्लीं शुद्धलेखनासंबंधीं चालू असलेल्या वादास धरूनच नाहीं काय !

जेव्हां काव्य लिहावयास जगतीं प्रारंभ मीं मांडिला,
जें जें दृष्टिंत ये तयावर 'करूं का काव्य ?' वाटे मला,
तारा, चंद्र, फुलें, मुलें किति तरी वस्तू लिहाया पुढें,
तेव्हां 'स्वल्पविराम' मात्र दिसतो स्वच्छंद चोहींकडे !

झालें काव्य लिहून–यास कुठल्या धाडूं परी मासिका ?
यातें छापिल कोण ? लावुं वशिला कोठें ? कसा नेमका ?
रद्दीमाजि पडेल का ? परत वा साभार हें येइल ?
सारें लेखन तेधवां करितसें मी 'प्रश्नचिन्हा' कुल !

अर्धांगी पुढतीं करून कविता नांवें तिच्या धाडिली,
अर्धें काम खलास होइल अशी साक्षी मनीं वाटली !
कैसा हा फसणार डाव ? कविता छापून तेव्हांच ये !
केला 'अर्धविराम' तेथ; गमलें तेथून हालूं नये !

झाली मासिकसृष्टि सर्व मजला कालांतरें मोकळी,
केलें मीं मग काव्यगायन सुरू स्वच्छंद ज्या त्या स्थळीं !
माझें 'गायन' ऐकतांच पळती तात्काळ श्रोतेजन !
त्या काळीं मग होतसे सहजची 'उद्गार' वाची मन !

पुढील श्लोक 'कोरसा' दाखल असून तो वाचकांनीं कवीला ऐकूं न जाईल अशा हलक्या स्वरांत गुणगुणावयाचा आहे. बाकी ऐकूं गेलें तरी काय व्हावयाचें आहे म्हणा?

> डेंग्यू, प्लेग, मलेरिया, ज्वर तसे अन् इन्फ्लुएंझा जरी
> हीं एकेक समर्थ आज असती न्याया स्मशानांतरीं—
> सर्वांचा परमोच्च संगम चिरं जेथें परी साधला,
> देवा, 'पूर्णविराम' त्या कविस या देशी न कां आजला?¹

१. आमच्या गायनप्रिय रसिक वाचकांसाठीं वरील कवितेचें 'नोटेशन' आम्ही येथें देत आहोंत. त्यामुळें कवितेच्या अर्थाबरोबर तिच्यांतील 'संगीत'ही वाचकांना सहज समजून येईल. काव्यगायनेच्छू बालकवींचीही त्यामुळें चांगलीच सोय होणार आहे. मात्र 'स्वरलेखन' करतांना आम्ही 'प्रो० मौलाबक्षांचीं चिन्हें' न वापरतां आमचीं स्वतःचीं 'चिन्हें' वापरलीं आहेत, हें एक सुचिन्हच नव्हे काय? स्थलाभावामुळें टंकालयांतील (Foundry) टंचाईमुळें दर श्लोकांतील एकाच चरणाचें नोटेशन देणें शक्य झालें आहे.

, ? ; ! . ॥ध्रु०॥

,SS ,S ,SSS ,SSS ,SSSSS १
?SS ?S ?SSS ?SSS ?SSSSS २
;SS ;S ;SSS ;SSS ;SSSSS ३
!SS !S !SSS !SSS !SSSSS ४
.SS .S .SSS .SSS .SSSSS ५

## एक काव्यप्रकार

एका सरकारी कचेरीचा भाग. धोंडो व गुंडो नामक कारकून शेजारीं शेजारीं बसलेले असून त्यांच्यासमोर कागदांचा व फायलींचा भयंकर ढीग पडलेला आहे. काम करून करून कारकूनद्वय अगदीं मेटाकुटीला आलेलें आहे.

धोंडो : (जांभई देत)
काम केव्हां सरे

गुंडो : (निःश्वास सोडून)
—हाय ! केव्हां तें सरेल ?
वाटतें, कंबर आतांच मोडेल !
काय रे देवा ही आमुची स्थिती ?
बरें आहे, चालूं द्या ! ना तरी मिळेल
येथून गचांडी ! छे, तें नको रे बाबा !

(अंगावर कांटा आल्यासारखें करतो. इतक्यांत शिपाई आणखी दोन फायली आणून ठेवतो.)

धोंडो : (स्फुंदत)
अंतच न देवा ! कां रे या फायलींलागून ?
काम केव्हां सरे ?

गुंडो : (निःश्वास सोडून)
—हाय ! केव्हां तें सरेल ?

धोंडो : (धीर करून)
बरें तर गुंडो, काढा एक विडी

गुंडो : (घाबरून)
छेः, छेः, नको रे राजसा असें तूं करूं !

धोंडो : (निश्चयानें)
कांहींही म्हटलें तुम्ही जरी आतां
शिलगावतोंच—

(विडी पेटवतो. तोंच आंतून साहेब येतो व धोंडोला विडी ओढ-तांना पाहून त्याच्या पाटींत गुद्दा मारतो. धोंडो पळून जातो.)

धोंडो : (पळतां पळतां)
होऊं नये तें झालें !—

गुंडो : (स्वगत हंसून)
व्हावें तेंच झालें !—
एकटाच विडी ओढतो लेकाचा !

[वरील वाङ्मयप्रकाराला मुक्तछंदी काव्य म्हणतात. मेहरबानी करून हें काव्य वाचतांना वाचकांनी मूर्च्छित पडूं नये.]

# वधूवरांना काव्यमय अहेर[1]

[चाल—चंद्रकांत]

अहा, उगवली आनंदाची शुभमंगल वेला,
आज तुम्हा अस्मान ठेंगणें वाटे ना ? बोला ?

रोमांचांतुनि हर्षाच्या ना उसळतात लाटा
गांभीर्याचा मुग्धपणा मग कां वदनीं खोटा !

उत्सुकतेनें तुम्ही पाहिली आजवरी वाट
प्रसंग आला तोच ! शांत कां मग मिटवुनि ओंठ ?

लग्नाचें काढितां तुम्हां कुणि आजवरी नांव
'छे–भलतें !' दाविलात लटका असाच ना भाव ?

'नव्हतें कारण लग्नच !' तर मग कां बसलां आतां
सस्मित वदनें 'अन्याया'चा प्रतिकार न करतां ?

तरुण मंडळी 'नको' बोलती अर्थ परी त्याचा
काय असे तो नीट उमगतो थोरांतें साचा !

असो; कसे पण वॉरंटाविण आज तुम्ही झालां,
खरे चतुर्भुज ! ('जन्मठेप' कुणि म्हणति बरें याला !)

अरे, कुणी हे लांबलचक विधि लग्नाचे केले ?
हाच चालला विचार मनिं ना ! (तें मजला कळलें !)

वाङ्‌निश्चय, श्रीमंतपूजनें आणि रुखवतें तीं,
आनंदाच्या समयिं कशाला ही भारुडभरती !

पक्वान्नें रुचिमधुर कशाला भोजनास भरती
'त्या घासा' विण विचार असतो का दुसरा चित्तीं !

मुंडावळि या डोळ्यांवरतीं पुन्हा पुन्हा येती
नीट न दिसतें 'मुख तें'! अगदीं कटकट ही नसती !

किती यातना वधूवरांच्या हृदयाला होती !
वृद्धांना कळणार तरि कधीं या नाजुक गोष्टी ?

लग्नकाळिंचा अनुभव अपुला विसरतात सारे
म्हणुनि वधुवरां निष्कारण ते छळती म्हातारे।

घांस घालणें, विड्या तोडणें नांव आणि घेणें
हाताला अन् हात लावणें ! पदरगांठ देणें !

एवढेच विधि विवाहांत जरि ठेवतील मोठे
उरेल तर मग पृथ्वीला या स्वर्ग दोन बोटें !

निष्कारण भटभिक्षुक म्हणती लग्नाचे मंत्र
तरुणांच्या हृदयांतिल त्यांना नच कळणें तंत्र।

किती मंगलाष्टकें लांब हीं अजुनि न कां सरती ?
घसा खरडुनी कानाजवळी किंकाळ्या देती !

लाल अक्षता मारित सुटती डोक्यावर सारे
खराब होतिल केंस ! तेवढे नच कळतें का रे ?

चला संपलें दिव्य ! 'वाजवा' असा ध्वनी उठला
अरे, अजुनि हा अंतःपट तरि कुणी उंच धरिला !

मंडपांत कां लोक रिकामे रेंगाळत बसती,
हस्तांदोलन वा अभिनंदन कां करण्या येती ?

उगाच घ्यांवा किती कुणाचा मौल्यवान वेळ !
लोकांना आमुच्या कधीं हें रहस्य उमगेल !

स्पष्ट बोललों वधूवरांनों, क्षमा करा मात्र !
असेंच तुमच्या हृदयाचें ना असे खरें चित्र ?

चला बैसला जिवाजिवाचा आज खरा मेळ !
संसाराचा सुरू जाहला सुखद आज खेळ !

तुम्हा सांगतिल कुणी ‘ भवार्णव दुस्तर हा फार !
जीवन नुसति माया ! नसतें संसारीं सार !’

नका घाबरूं ! अशा ऐकुनी भुलथापा खोट्या,
अजीर्ण ज्यातें श्रीखंडाची रुचि येइल का त्या ?

आनंदाची सर्व सुखाची जीवित ही खाण
हंसेल आणी जगेल त्यातें नच कसली वाण !

नका त्रासुनी बघूं ! समजलें ! आवरतों सारें !
म्हणाल ना तरि “ बोलुनि चालुनि कवि बेटे न्यारे !”

आनंदाचा मधुर मनोहर वसंतकाल सदा,
तुम्हास लाभो ! हीच शेवटीं विनंति ईशपदा !

आणि सांगतों अखेर एकच कीं भांडणतंटा
जरि झाला कधिं तरि तो द्यावा प्रेमानें मिटता !

आरंभीं येतील अडथळे ! जोंवरी न हलला—
सदनिं पाळणा—क्षमा करा, हा चुकुनि शब्द गेला !

१. श्री. सरदार श्रीनिवासराव मल्हाराव ऊर्फ बाबासाहेब पुरंदरे व चि. सौ. कां. लीलाबाईसाहेब पटवर्धन (श्री. चीफ ऑफ कुरुंदवाड, ज्यूनियर यांची भगिनी) यांच्या विवाहाच्या प्रसंगीं केलेला कवितांचा आहेर.

## एका पावासाठीं—

चांगला 'पाव' हल्लीं पहावयासदेखील मिळत नाहीं. मग खायला कोठून मिळणार ? पावाच्या शोधासाठीं रस्त्यामधून पावभक्तांच्या झुंडीच्या झुंडी हिंडत असतात. त्या मनांत पुढील गाणें म्हणत असतील काय ?

धांव पाव देवा आतां । देई एक पाव !
मारुं चहावरतिं कसा मी । कोरडाच ताव ?
पाव नाहिं म्हणुनी पत्नी । करित काव काव !
पावरोटिसाठीं आलों । धुंडुनि मीं गांव !
माजलेत बेकरिवाले । म्हणति 'चले जाव !'
बोलतो हंसून इराणी । 'जा चपाती खाव !'
वाढवी गव्हाचे वाणी । चौपटीनें भाव !
नफेबाज व्यापाऱ्यांचा । हाणुन पाड डाव !
पाहिजे तरी सरकारा । तूंच लोणि लाव !
नरम पाव देऊन देवा, । राख तुझें नांव !

## बायको सासरीं आल्यानंतर—

फार दिवस माहेरीं जाऊन राहिलेली बायको सासरीं परत आल्यानंतर तिच्या बाईलवेड्या नवऱ्यानें आंघोळ करतां करतां पुढील गाणें म्हणणें साहजिकच नव्हे काय ?

बायको आली आज परतून ! ॥ धृ० ॥

बारा महिने तब्बल बसली माहेरीं जाऊन !
वाटुं लागलें नवऱ्याला कीं गेलि काय विसरून !

झोपुनि झोपुनि रोज एकटा गेलों कंटाळून,
थकुनी गेलों सक्तीचें हें ब्रह्मचर्य पाळून !

आंघोळीला रोज यापुढें मिळेल पाणी ऊन,
गरम चहाचा प्याला हांसत येइल ती घेऊन !

लोकरिचा गळपट्टा रंगित देइल सुबक विणून,
आणि फाटक्या कपड्यांनाही ठिगळें छान शिवून !

टाकिन आतां सर्व घराचा रंगमहाल करून,
तात्यामाई[१] घेतिल दिवसा मग डोळे झांकून !

१. आईबाप.

## मोडीसाठीं धांव

मोड मिळण्याची हल्लीं भयंकर मुष्किल झाल्यामुळें पै-पैशाचा व्यवहार करणाऱ्या गरिबांची रोजच्या जीवनांत सध्यां जी कुतरओढ चालली आहे तिला तोड नाहीं ! मोडीच्या दुष्काळानें गांजलेली गरीब जनता मनांतल्या मनांत परमेश्वराला असेंच गाऱ्हाणें आळवीत असेल काय ?

दे रे हरि, दोन आण्याची मोड !
मोडीसाठीं भटकुनि आले तळपायाला फोड ॥ धृ० ॥

काडि मिळेना, विडी मिळेना, इतर गोष्ट तर सोड !
मीठहि नाहीं, पीठहि नाहीं, मिळे न कांहीं गोड !

पै पैशाचे धंदे बसले, झाली कुतरेओढ !
'मोड नाहिं,' चे जेथें तेथें दुकानावरी बोर्ड !

ट्रॅम गाडिंतहि मोड न म्हणुनी, करितों तंगडतोड !
कुणी 'कूपनें' घेउनि काढी नोटांवरती तोड !

मोडीवांचुनि 'धर्म' थांबला, भिकारि झाले रोड !
दिडकि कशी तुज देऊं देवा, प्रश्न पडे बिनतोड !

श्रीमंतांचें कोड पुरवुनी मोडिशि अमुची खोड !
पाड दयाळा, खुर्द्याची रे आतां पाऊसझोड !

# अजि म्यां 'काका' पाहिला !

'अजि म्यां सिंह पाहिला !' ही ना. काकासाहेब गाडगीळ ह्यांनी रचलेली काव्यपंक्ति वाचून आमच्या तोंडून पुढील काव्य बाहेर पडलें !

अजि म्यां 'काका' पाहिला !

खांदा कांबळ, शिरीं मुंडासें,
बैलाच्या गाडींत बैसला !

निवडणुकीचा कुजका नारळ
घेऊनि आला घोडनदीला

तिखटमिठाच्या देइ करंज्या
म्हणतो साखर हवी कशाला ?

सांगे 'धरणें' पुरीं होउं द्या
मग निर्मा तुम्हि कोटि प्रजेला !

पकडुनि 'काळा व्यापारी' द्या !
मग मी मारिन म्हणतों त्याला !

म्हणे धन्य तो वल्लभभाई
रफ्फु करी जो शालजोडिला !

मतदारांना सदैव पाजी
थापांचा जो 'काका–कोला' !

१५ जुलै १९५१

## हातांत घ्या काळें निशाण

आतां मराठ्यानों, उठा
हातांत घ्या काळें निशाण !
ते दोन मंत्री बेइमान
आले हिरे आले चव्हाण !

मंत्रीपदास्तव टाकिलें
ह्यांनीं महाराष्ट्रा गहाण !
कापून मुंबइचा गळा
ह्यांनींच केली धूळधाण !

मुंबापुरींत मुरार्जिनें
'शिर्काण' केलें तें भयाण !
सामील झाले त्याज हे
मंत्री मराठी बेइमान !

मालोजिच्या वाड्यांतुनी
तो गर्जला ऐसा चव्हाण—
"थूः त्या महाराष्ट्रावरी
मज नेहरू देवासमान !"

बोले हिरे, "मीं हें दिलें
काँग्रेसला माझें इमान !
काँग्रेसश्रेष्ठींच्या पुढें
मी आपली कापीन मान !"

काँग्रेसला ह्याच्यापुढें
नाहीं महाराष्ट्रांत स्थान !
आली पुन्हा मत मागण्या
पायांतली दावा वहाण !

मोरार्जिंच्या पायांतले
हे दोन मंत्री पायताण
मंत्रीपदास्तव जाहले
हे नेहरुंचे दोन श्वान !

आतां मराठ्यांनों, उठा,
आहे तुम्हां ना स्वाभिमान ?
जेथें हिरे, जेथें चव्हाण
तेथें अतां काळें निशाण !

२५ मार्च १९५६

## वाहवा, वाहवा, नेहरू हा !

वाहवा, वाहवा, नेहरू हा
सुंदर किततरि खचित अहा !
तर तो आपण पाहूं या,
त्याला जाउनि सांगूं या;
नेहरूकाका,
मुंबइ टाका
आई आहे ही अमुची
नाहिं कुणाच्या बापाची !

अरे बापरे ! पळा पळा
नेहरूकाका रागवला !
बंदुकवाले पोलिस हा
घेऊन आला पहा पहा !
म्हणतो, "मुंबइ
देतच नाहीं"
मान हलविली जोरांत
टोपी पडली चिखलांत !

नेहरूकाका घाबरला ! घाबरला,
दडून मोटारिंत बसला
इतुका कां हो रागवतो ?
लाल टमाटो हा दिसतो !
नको रे बाबा
चिडका बिब्बा
नेहरूकाका हा हट्टी
ह्याची अमुची फू गट्टी !

१७ जून १९५६

## पारण्याचें गाणें

घोट घ्यावा शंकररावा
गांधीजीच्या नंदीदेवा ॥ धृ० ॥

अकरा दिवस उपोषण
थकला कीं हो तुम्ही करून
दिसे तोंड कळाहीन
जसा कांहीं 'सुका मेवा'!

हिंसा मुंबईंत झाली,
होई मांगल्याची होळी!
मानव्यानें बोंब केली
"धावा शंकरदेवा, धावा!"

तुम्हां झालें दुःख फार
म्हणाला कीं ह्याचा भार
आहे माझ्या शिरावर,
उपासाचा केला कावा!

मुंबईचे लोक दुष्ट
किती बोलले वाईट
"जा जा बुडा समुद्रांत–
उपासानें मरा किंवा!"

केल्या महाराष्ट्रासाठीं
किती ह्यांनीं आटापिटी
परी नाहीं कोणा 'पिटी' (pity)
शिरजोर पक्ष डावा!

कोणी निंदा कोणी वंदा,
उपोषण ह्यांचा धंदा
आहे गांधीशिष्य बंदा
सदा संकटीं स्मरावा !

घेवोनियां प्रायश्चित्त,
तुम्ही शुद्ध केलें चित्त,
घ्यां हो मोसंब्याचा घोट
आज दिवस बारावा !

चला लौकर घ्या हो घोट
नका उपटूं दाढी–खुंट,
उद्यां 'टाइम्स' पत्रांत
फोटो एवढा हा द्यावा !

२६ फेब्रुवारी १९५६

## चव्हाणांना पुणेकरांचा निरोप

पुण्याच्या शिवाजी आखाड्यामधून मोटारींत बसून पळून जातांना ना. यशवंतराव चव्हाणांना पुण्याच्या जनतेनें असाच निरोप दिला असेल काय ?

मंत्र्या, येशिल कधिं परतून ?
आज दिलेल्या 'आहेरा'ची ओळख नीट धरून ॥ धृ० ॥

कितीक गेले भजीं पुण्यांतुनि आजवरी खाऊन,
परि चपलांची तूंच एकटा जाशि माळ घालून !

निदर्शकांच्या आरोळ्यांनीं घाबरगुंडि उडून
अर्धें भाषण करुनी जाशिल पुन्हा असाच पळून !

'काळि निशाणें' तशिंच राहतिल व्यर्थ घरांत पडून,
आश्रयदाता आहे त्यांचा कोण तुझ्यावांचून ?

भाषण ऐकायाला श्रोता नाहिं सभेंत चुकून,
उभे लोक बाहेर 'स्वागता' अनवाणी होऊन !

लाठीवाले पोलिस संगें ये अपुल्या घेऊन,
काळा बुरखा आणि हवा तर तोंडावर ओढून !

सत्काराची अशीच संधी दे रे अधुनमधून,
म्हणजे तुटक्या पायतणांना येइल भाव फिरून !

जर का येशिल गणू तपासे–मालोजिस घेऊन,
येइल सारें पुणें तिघांच्या 'सत्कारा' धावून !

मार खाउनी जो जो पळतो पुण्यपत्तनांतून
तो 'इतिहासीं' अमर होतसे; विसरूं नको ही खूण !

२१ एप्रिल १९५६

## आरती भाऊसाहेब हिऱ्यांची !

'आवश्यकता पडेल तर मंत्रिपदाचा राजीनामा देऊ' ही भीषण घोषणा करण्याचें अलौकिक धैर्य दाखविल्याबद्दल सारे महाराष्ट्रवीर भाऊसाहेब हिऱ्यांना अशीच आरती ओवाळीत असतील काय ?

*[चाल—आरती ज्ञानराजा]*

आरती हिरेभाऊ
नका राजिनामा देऊं ! ॥ धृ० ॥

महामूर्ख लोक वेडे,
मारतात तुम्हां जोडे,
दाखवीती काळे झेंडे
नका लक्ष तिकडे देऊं !

देह जावो अथवा राहो,
मंत्रिपदीं तुमचा भावो
कोणी फोडो किती टाहो
म्हणो तुम्हां जोडेखाऊ !

कसा येश्वंता चव्हाण
घट्ट जागेला चिकटून
बैसे जसा कीं ढेकूण
गादीमध्यें मऊ मऊ !

पुसा नेहरूंचे बूट
झेला मोरारजींची लाथ
चाटा ढेबरांचे हात
तेच तुमचे बापभाऊ !

जळे ना का महाराष्ट्र
त्याचे तीन कोटी पुत्र,
तुम्ही म्हणा एक मंत्र
मरूं—पण मंत्री राहूं।

२४ जून १९५६

## सुंदर तें ध्यान—

सुंदर तें ध्यान। दिसे नेहरूंचें
शिरीं सदोबांचें। शिरस्राण !

वरी मोरारजी। धरीतसे छत्री,
भोंवताली कुत्रीं। खादीवालीं

अध्यक्ष ढेबर। चालला मागून,
चार्ली चापलीन। कॉंग्रेसचा

सभोंवार खड्या। पोलिसांच्या फौजा,
जवाहर राजा। मध्यें चाले

पाही जेव्हां काळे। झेंडे घरोघर
ऐके अन् गजर। महाराष्ट्राचा !

पेटे डोळ्यांमध्यें। क्रोधाचा अंगार
कांपे थरथर। संतापानें

म्हणे, "निवडणुका। जाऊं द्या खड्डयांत
मरूं द्या भारत। खुशाल तो !

नाहीं मी देणार। मुंबई महाराष्ट्रा,
मारा बोंबा आतां। पांच वर्षें !"

हासले ढेबर। मोरारजी, स. का.
पोलीस बंदुका। सरसावती !

'अत्रे' म्हणे आतां। शिवरायावीण
रक्षील कवण। महाराष्ट्राला !

१० जून १९५६

## नव काव्य

माझी मेहुणी सुंदर
जशी नाजूक कदली
मनीं वाटले येइल का
कधीं बहिणीच्या बदली !

* * *

गेले दिवाळसणाला
घाईघाईनें जावई
तांब्या पालथा पाहुनी
ओरडले, 'अग्गो बाई !'

* * *

गुन्हा विनयभंगाचा
झाला कुणाच्या हातून
गुन्हेगारासी बाधलें
स्त्री-पोलिसाचें चुंबन !

२३ नोव्हेंबर १९५२

घनश्याम बंदरा सदोबा—

## भूपाळी

घनश्याम बंदरा सदोबा, अरुणोदय झाला,
उठिं लौकरि बा, प्राशन करिं हा चल 'कोका कोला!' ॥ धृ० ॥

सोडावॉटर बॉटल घेउनि हातीं हा आला,
केशव बोरकर तुझा लाडका तुझ्या दर्शनाला!

पैशाच्या हा थैल्या घेउनि बाबू चीनॉय,
हात जोडुनी उभा जसा कीं चपराशी बॉय!

पारिख नाथालाल हिऱ्यांची घेउनि ये पेटी
परदेशीच्या दौऱ्यावर ये तुज नेण्यासाठीं!

विजार लांडी, हातीं कांकण, शिरीं निळा फेटा,
चला उठा त्या प्रतापसिंगा कडकडुनी भेटा!

थुंकि झेलण्या, जोडे पुसण्या आणि इतर कामा
मिशाळ शर्मा येइ, तसा तो हर्डीकर रामा!

भेटायाला तसा तुला बघ उत्सुक हा झाला,
मुंबईतल्या हातभट्टिच्या दादांचा मेळा!

ह्या सर्वांच्या आधारावर केल्या तूं मौजा,
जाहलास अन् मुंबापुरिचा 'अनभिषिक्त' राजा!

फंड जमविला देशासाठीं तुवां तीन कोटी,
कुणा न कळलें कमाविलें किति कमिशन त्या पोटीं!

दुष्ट मराठी दैत्यापासुन हे वल्लभबाळा
गुजरात्यांचें रक्षण करण्या तूं ना अवतरला?

गुर्जर जनता पूजितसे तुज भक्तीनें आजी
हृदयमंदिरांतला तयांच्या तूं श्रीबालाजी !

ऊठ नेहरूनंदिकेश्वरा, उशीर बहु झाला,
—आणि तशांतुन मुरारजीचा फोनहि बघ आला !

१५ जुलै १९५६

## मोरया तुझें, नांव चांगलें

मोरया, तुझें नांव चांगलें
भारतामध्यें फार गाजलें
करुनि मोरया, तूं उपोषण
दगड खाउनी करिसि भाषण

मोरया, तुझें राज्य चांगलें
चोर गुंड हे फार माजले
दारुबंदिचा करुनि कायदा
करिसि आमुचा तूंच फायदा

मोरया, तुझी गोळि चांगली
वर्मि लागुनी, घेतसे बळी
वृद्ध आणखी बालकें स्त्रिया
यावरी न ती करितसे दया

मोरया, तुझे मंत्रि चांगले
चप्पल खाउनी फार भागले
स्वार्थ साधण्या गाति आरती
घेऊनी तुला रोज नाचती

१६ सप्टेंबर १९५६

## उपवासी 'देव' माझा

उपवासी 'देव' माझा
सांगा कुणी पाहिला ? ॥ धृ० ॥

जीर्ण मलिन पंचा ज्याचा,
बघुनि जीव धाला !

बोट बोट दाढी ज्याच्या
शोभवीत गाला !

राष्ट्रकार्यि आंघोळीला
वेळ नाहिं ज्याला !

सदोबास बसतां जोडे
व्यथित जो जहाला !

मारितो 'मुरारी' गोळ्या,
घालि त्यास डोळा !

हृदय नेहरूंचें बदलिन,
हाच ध्यास ज्याला !

स्त्रीवांचुन चिटणिस अपुला,
नेमिना कुणाला !

ब्रह्मचर्य रक्षण करण्या,
श्रमवि जो जिवाला !

गांधिचें विडंबन करणें,
हाच एक चाळा !

महाराष्ट्र—वैरी अंतरिं,
वरुनि सांभ भोळा !

२० मे १९५६

## शमिवरचीं शस्त्रें—

शमीच्या झाडावर काकांनी लपवून ठेवलेल्या 'शस्त्रां'च्या रहस्याचा शेवटीं असा स्फोट झाला!

*[चाल—गोकुळींचा कान्हा माझा]*

शमिवरचीं शस्त्रें माझीं
पाहिलींत काय हो? ॥ धृ० ॥

उंच तिथें त्या ढोलींत
बांधुनियां मी फडक्यांत
ठेविलींत शस्त्रें गुपचुप
नका कुणा सांगुं हो!

भिऊं नका मर्द मराठे,
बसला हा काका येथें;
पाटीशीं अर्जुन असतां
भीति तुम्हां काय हो?

लढूं मुंबईच्यासाठीं
मुंबईच्या रस्त्यावरतीं
भारतीय युद्ध तुम्हाला
फिरून आठवेल हो

'नको सुखी जीवन मातें
मरण थोर लाभो मातें!'
कर्ण म्हणे जें कुंतीला
मजसि हवें तेंच हो!

योग्य वेळ आली जर का
नेहरूंना देइन धक्का
मी 'नरां' तला 'हरि' आहें
विसरुं हें नका अहो !

उठलि तोंच उंच आरोळी—
'गेलि हो मुंबई गेली' !
परि शमिच्या खालीं काका
शांत झोंपिं जाइ हो !

तोंच कुणी घाई घाई
शमिवरतीं चढला 'भाई'
आणि जुना 'वस्तरा' परि
करिं त्याच्या येइ हो !

"नसे नसे अर्जुन काका"
लोक मारिती मग हांका !
"या बृहन्नडेच्या हातीं
बांगड्या भरा किं हो !"

४ मार्च १९५६

## अहमदाबाद ! अहमदाबाद !

अहमदाबाद, अहमदाबाद !
गांधीटोपी मुर्दाबाद !

दिली मराठी वीरांच्या
बलिदानाला ज्यांनीं साद
गुर्जरभूस्तव जे मेले
त्या शहिदांची ठेवा याद !

हौतात्म्याच्या नात्यानें
भाई भाई झाले आज.
धन्य मराठी गुजराती
सरला त्यांचा आतां वाद.

मोरारजींच्या फोटोची
होळीमाजीं झाली राख
वल्लभ–गांधींच्या नगरीं
कॉंग्रेस्‌चा जिरला उन्माद !

साबरमतिच्या जलांतुनी
एकच उठला हा जयनाद !
महाद्विभाषिक हो बरबाद
गुर्जरभूमी झिंदाबाद !

अहमदाबाद, अहमदाबाद !
गुर्जरभूमी झिंदाबाद !

१९ ऑगस्ट १९५६

## आलखण पालखण—

आलखण पालखण सदाशिवा
शेटाणि म्हणते, "पाटिलबुवा !
रामा करतो 'गनिमी कावा'
वांचवा मजला, धांवा धांवा—"

पाटिल म्हणतो, "ढसा ढसा
नको रडूं ग, उघड कसा !
भर माझा हा आधीं खिसा
मग लढतों मी पहा कसा !"

शेटाणि म्हणते, "हवे तेवढे
घे रुपये, जा दिल्लीकडे !"
भरुन खिसा मग पाटिलबुवा
गपचुप गेले अपुल्या गांवा !

# द्विभाषिक राज्याचीं गाणीं

. १ .

*[ चाल—नका टाकून जाउं डावा डोळा ]*

ना रे तजीने जाऊं डावा डोळा
पाण्यानें मारा भर्यु रे ॥

तारे माटे, घणुं मी झुरते
व्हाला, लाग्यू रे घोर जिवाला ॥

बा तमारी, सासु मारी
व्हालो, घुस्सा करता ना रे मजला ॥

. २ .

*[ चाल—सकाळीं उठोनि, देवासी भजावें ]*

सवारे उठीने, देवासी भजावें
गुरुने नमीजे, जीवें भावें ॥

बापुजीनी आज्ञा घेतल्यावांचुनी
कुठें घरमाथीं जतां नहीं ॥

नेमियल्या वेळीं, निशाळ जजोरे
ध्यान सदा आपो, पाठाकडे ॥

रस्यामाथीं जाता भवाई जोता ना
वचमा कोठेंहि, थाभो नये ॥

१६ ऑक्टोबर १९५५

# काकाष्टक

*[चाल—विडा घ्या हो नारायणा]*

टोपी घ्या हो गाडगीळा,
नीट घट्ट आतां घाला
टाळूवर चोरट्यानें
कसा हात फिरवीला ? ॥ धृ० ॥

फडणीस नानावाणी
तुम्ही बुद्धीचे ना हौद ?
घेउनी गेला पाणी
मुठामुठेचें दिल्लीला !

केवढा पराक्रम
लोकसभेमाजीं केला !
सदरा वर करूनी
पोट दाविलें सर्वांला !

घेतलींत नाना सोंगें
इलेक्शन जिंकायाला,
बांधिलेंत किसानांचें
तुम्ही मुंडासें डोईला

जेधे आणि तुम्ही भाऊ
जसे रामलक्ष्मण
शेवटीं परि त्यांचा
घात चुंबूनियां केला !

आनंदीच्या वियोगानें
केल्या आळंदीच्या गोष्टी

महिन्याच्या आंत एका
परि चतुर्भुज झालां !

साखरेचा दुष्काळ
एका दिवाळीला झाला;
परि खाऱ्या करंज्यांचा
तुम्ही संदेश ना दिला !

पटेलांची आज पूजा
उद्यां जवाहर राजा !
तुमच्या काळजाचा
ठाव लागेना कुणाला !

'नामदेव न्हावी' जाणे
काका तुमची योग्यता
आशीर्वाद आहे त्याचा
सदा तुमच्या डोक्याला !

१७ फेब्रुवारी १९५२

## सदोबांची आरती

वर्षें अट्ठावीस घेउनि बसलास
हातीं बळकट आपुल्या मुंबई कॉंग्रेस;
केले भवतीं गोळा गावांतिल टोळ,
झुलतो दारीं घोडपदेवाचा पोळ;
जोडुनि हात पुढें शर्मा मिशाळ,
वामांगीं शोभतसे नलिनी गोपाळ;
जय जय सदोबा, दादांच्या दादा
देशाच्या सेवेचा केला तूं धंदा!
जय जय, जय जय!

पैसेवाल्यांना तिकिटें देऊन,
कॉर्पोरेशन्‌चें त्वां केलें दुकान;
गोरगरिबांच्या हातीं नरोटी
प्रतापसिंगाला कंत्राटें मिळती;
मेयरची गादी जणुं बापाचा माल
तीन वर्षें तब्बल बससी खुशाल!
पाठविशी पोरांना अमेरिकेमाजीं
जय जय सदोबा, धन्य असो तूझी!
जय जय, जय जय!

आठ आण्यांचा सद्रा घालिशि अंगांत
फिरशी मोटारींतुनि कोऱ्या कर्करित;
जागोजागीं तूझे गांवांतुनि फ्लॅट,
भागीदारी आणिक नाना धंद्यांत!
सरकारी कमिट्यांचे मिळती तुज भत्ते
परदेशीं जाउनियां करशी तूं सट्टे!
देशभक्त मेले करुनी अन्नान्न,

सांपडली तुजला परि सोन्याची खाण
जय जय, जय जय!

वल्लभभाईचा सच्चा तूं चेला!
संयुक्त महाराष्ट्राचा विध्वंस केला,
भांडवलवाल्यांचा स्वीकारुनि मलिदा
गरिबांच्या मुंबईचा केला तूं सौदा!
पाकिस्तान्यांना हातीं धरून
शर्थीनें मोठ्या तूं येशी निवडून!
पंडित नेहरूनीं थोपटली पाठ
दिल्ली उरली आतां तुज दोनच बोटं!
जय जय, जय जय!

२४ फेब्रुवारी १९५२

## हातभट्टीचें गाणें

आनंदी आनंद गडे । दारूबंदी चोहिकडे
हातभट्टीला भाव चढे । गल्लोगल्लीं मौज उडे
सरकारी उत्पन्न बुडे । गुंडांना धनलाभ घडे
तांदुळ भिजवा
गूळहि कुजवा
भट्टी शिजवा
घाला नवसागर त्यांत । ग्रामोद्योगाची रीत

कशास जातां गोव्याला । दमण आणखी वापीला
मिळते आपुल्या गल्लींत । हवी तेवढी रस्त्यांत
जिन्याखालतीं अंधार । तिथें चोरटा व्यापार
जरि कां आला
कोणी साला
पोलिसवाला
हात करूं त्याचा ओला । बरकत येई धंद्याला

शंका येइ न कुणा जिथें । भट्टी लावा तुम्ही तिथें
मंत्र्यांच्या आवारांत ! किंवा ब्राह्मणवस्तींत
पोलिस चौकी समोर वा । खुशाल धंदा खोलावा
धाड आली जरि
कधिं सरकारी
भिऊं नका तरि
दडवा डबडीं निर्धास्त । गटारांत संडासांत

माल पाठवूं उघडपणें । इकडुनि तिकडे मौजेनें
पायगाडिच्या रबरनळ्या । खुशाल न्याव्या भारुनि खुल्या
स्वच्छ दुधाच्या भांड्यांत । किंवा लपवुनि मांड्यांत

मोटारींतुनि
पेटाऱ्यांतुनि
न्या भरभरुनी
नऊ महिन्याच्या 'गर्भवती' । दारुबाटल्या प्रसवीती

अन्नाचा दुष्काळ पडे । भूकबळी जिकडे तिकडे
गरिबांना नाहींत घरें । रस्त्यावर निजती सारे
पीक नीतिचे परि पिकलें । रामराज्य भूवरि आलें
चोरीमारी
आणि सुरेगिरी
वाढे भारी
धन्य धन्य परि बाळाजी । अन् गाजी तो मुरारजी

२ मार्च १९५२

# होळीवर पोळी

*गझल*

काय वर्णूं भारताची, वाहवा ही लोकशाही
स्थान येथें अपयशाला, यापुढें कोठेंहि नाहीं.
निवडणूकीमाजिं पडला, कोणिही कॉंग्रेसवीर
विजयमाला कंठिं परि हो, पडतसे त्याच्या अखेर!

दोनदां तो कोलमडला, मोजणीमाजी मुरारी
मुंबईचा मुख्यमंत्री, तरिहि ती होणार स्वारी
आगगाडी–मंत्रि पडला, मद्रदेशीं तो अपेशी
तरिहि बेटा तो गव्हर्नर, होइ विंध्याचल प्रदेशीं!

दोन राष्ट्रांमधुनि धक्के, खाउनी जी परत आली
वाटतें होणार मंत्री, यापुढें ती दिल्लिवाली;
मंत्रि अर्धा डझन पडले, लागलें तोंडास काळें
तरिहि तेथें म्हणति, 'आम्ही राज्ययंत्रा लावुं टाळें!'

नाचा तुम्ही नालायकांनों, हासा पडेलांनों, तुम्ही
आज तुमच्या फायद्याची, येतसे ही पर्वणी
पेटली चोहींकडूनी, लोकशाही भारतीं
होळिवर या पोळि अपुली, भाजुनी घ्या संप्रती!

९ मार्च १९५२

## हे चिमण्या चंद्रा—

चंद्रावरून आपण तांदूळ घेऊन येऊं अशी नेहरूंनीं परवां घोषणा केल्यानंतर—

हे चिमण्या चंद्रा, देशिल केव्हां पाठवुनी तांदूळ ?

दूध पिउनी कौमुदीचें
पोट भरतें फक्त कविचें;
परि गरिबांना का भरतां येइल तव किरणांची चूळ ?

सौख्य देशी तूं चकोरा,
धुंद करिशी प्रेमवीरा,
परि कंगालांच्या पोटिं भुकेचे तडफडती वाघूळ

कृष्णपक्षीं क्षीण होशी
शुक्लपक्षीं वाढतोसी;
परि क्षयरोगानें केली आमुच्या आरोग्याची धूळ !

ग्रासिती तुज राहुकेतू
सुटसि ग्रहणांतून परि तूं
मग टंचाईचें ग्रहण लागलें कां आम्हां वाढूळ ?

औषधींचा तूं पती ना ?
देसि जीवन स्थिरचरांना;
बघवतें तुला मग कसें शशांका, हें रेशनचें खूळ

तांदुळाची शुभ्र वृष्टी
झडकरी करिं ही विनंती
ना तरी नेहरू करतिल स्वारी तुजवरि धरुनि त्रिशूळ !

१६ मार्च १९५६

# दळणाच्या ओव्या

दैनंदिन जीवनाचें दळण दळतांना मुंबई राज्यांतील जनता ह्याच ओव्या गात असेल काय ?

पहिली माझी ओवी, गीतें नेहरूंना,
देती भुकेलेल्यांना, व्याख्यानें जे !

दुसरी माझी ओवी, विजयालक्ष्मीला,
भावामुळें जिला, भाव आला !

तिसरी माझी ओवी, कनू मुनशीला,
अन्नान्न मंत्र्याला, भारताच्या !

चवथी ओवी ही, काका गाडगीळा
बाशिंग गुडघ्याला, ज्याच्या सदा !

पांचवी माझी ओवी, शंकर देवाला,
करा कुणी त्याला, राष्ट्राध्यक्ष !

सहावी माझी ओवी, सदोबा पाटला,
लक्षाधीश झाला, देशासाठीं !

सातव्या ओवींत, गाऊं बाळू खेर,
हासे वरवर, फोटोसाठीं !

आठवी माझी ओवी, गातें मुरारीला
पडेल वीराला, बल्साडच्या !

नववी माझी ओवी, नव्या पुढाऱ्याला,
नकली हिऱ्याला, नाशिकच्या !

दहावी माझी ओवी, सरलें दळण,
लागलें ग्रहण, स्वातंत्र्याला !

२३ मार्च १९५२

## म्हातारा इतुका न—

श्री. राजगोपालाचारियर मद्रासचे मुख्यप्रधान झाल्यानंतर—

म्हातारा इतुका न, परि हा बनला फिरुनि जवान
दिल्ली सोडुनि गल्लीचा हा झाला पंतप्रधान !

चष्मा काळा शोभे डोळां डोइस टक्कल छान
हातीं सोटा पंडित मोठा बृहस्पतीवर ताण !

संन्यासाचें सत्रा वेळां आणी हा अवसान
वैराग्याचीं वस्त्रें हातीं, संसारावर ध्यान !

सीतेसाठीं जसा धांवला लंकेला हनुमान
मद्रासेला तसा करी हा दिल्लीहुन उड्डाण !

गांधीजींचा व्याही होता जीनांचा मेहमान
सुपीक मेंदूंतून निघालें ह्याच्या पाकिस्तान !

सत्य-अहिंसा-मंत्राने हा करितो कारस्थान
ह्या चाणक्यापासुन राखीं भारतास भगवान्

१३ एप्रिल १९५२

## मंत्री हा जुल्मि गडे—

मंत्री हा जुल्मि गडे, यास पुन्हां निवडूं नका
छळितो हा फार तुम्हा, यास मत देउं नका ॥ धृ० ॥

साधूचा आव जनीं
सत्तेची हांव मनीं
मागिल दारीं घुसुनी
खातो हा भाव फुका !

मारि उड्या टणा टणा
नच अंगीं नम्रपणा
मग्रूरी दावि जना
यास भीक घालुं नका !

एकवार हा पडुनी
घेई शोभा करुनी
मतमोजणि फिरफिरुनी
त्यांत होती फार चुका !

नीतीचे करि चाळे
जनतेचें वाटोळे
अन्नवस्त्र नाहिं मिळे
स्वातंत्र्याचा विचका !

तळतळाट जनतेचा
भाव चढे रेशनचा
प्राण जाइ गरिबांचा
यांस पुन्हा निवडुं नका !

२० एप्रिल १९५२

## मोरारजी–विलाप

श्री. बाळासाहेब खेर ह्यांचा अखेरचा निरोप घेतांना मुंबईचे नवे मुख्यप्रधान श्री. मोरारजी देसाई हे टेलिफोनमधून ढळाढळां रडले अशी बातमी प्रसिद्ध झाली आहे.

नका टाकून जाऊं डावा डोळा । पाण्यानें माझा भरला ॥ ध्रु० ॥

माझ्यासाठीं
खटपट मोठी
केली तुम्ही जाऊन दिल्लीला !

तोंड काळें
जरिहि झालें
तरि तुम्ही लावला माझा वशिला !

मी हो बाळा,
तुमचा चेला,
घेईन छळून छळून जनतेला !

हात जोडीन्
दांत काढीन्
तुमच्यावाणी करिन सारा चाळा !

लोक मेले
जरिहि सगळे
नाहीं काढणार दारूबंदीला !

तुमचा कावा
मजसि ठावा
लाविन सुरुंग मी कोयनेला !

गहिंवर आला
कंठ भरला
रडुन झाला टेलीफोन ओला !

रडति मंत्री
रडति संत्री
रडे 'महंमद' हा पट्टेवाला !

२७ एप्रिल १९६२

## थोर तुझे उपकार !

मोरारजी देसाई बलसाडच्या निवडणुकींत पडल्यानंतर पुन्हां अहमदाबादेंतून निवडून आले. त्या प्रसंगास अनुलक्षून—

थोर तुझे उपकार, मंत्र्या, थोर तुझे उपकार ॥ ध्रु० ॥

आपटला तूं जरी एकदां घेशि न परि माघार,
लटपट मग तूं करुनी होशी मागिल दारीं स्वार !

वाढवुनी तूं घेई आपुला भत्ता आणि पगार,
सत्यअहिंसा तुझी दांडगी मायबाप सरकार !

भाव वाढवुनि धान्याचे करिं जनतेचा उद्धार,
उपाशिं लोकां लाल जोंधळा देउनि करिशी ठार !

चोर तुझ्यावर हल्ला करतां खाशी त्यांचा मार,
गरीब मजुरांवरी परी तूं करिशी गोळीबार !

गळ्यांत घालुनि घेशि फुलांचे रोज रोज तूं हार,
लाज न वाटे तुला कशाची थापा देशी फार !

भांडवलवाले तुझे सोयरे घे त्यांचा कैवार,
मोड झोंपड्या आणी उधळीं गरिबांचा संसार !

गटार उपशी दारूसाठीं पोलिस कर्तबगार,
हातभट्टीनें केलें तुजला खरोखरी बेजार !

खून दरोडे राज्यामध्यें अन् काळाबाजार,
घरदाराविण किती रखडती रस्त्यावर बेकार !

तरी नीतिचा बकवा करिशी साधूचा अवतार;
धन्य मंत्रि तूं तुझा करावा आम्ही जयजयकार !

थोर तुझे उपकार, मंत्र्या, थोर तुझे उपकार !

८ जून १९५२

## नवी मोटार

मुंबईच्या मंत्र्यांसाठीं अद्ययावत् मॉडेलच्या कोऱ्या मोटरगाड्या विकत घेण्यांत आल्या आहेत.

मी मंत्री झालों,
नवी मोटार आणुन कां हो द्या ना? ॥

झाले बारा महिने
नको मॉडेल जुनें
कोऱ्या गाडीवांचून मजा येइना !

रामराज्य करूं
मोटारींतून फिरूं
जनता उपाशी कां नी मरेना !

गरीबांचा पैसा
उधळूं या असा
झाली देशाची जरि या दैना !

पगार वाढवून घेऊं
खूप भत्ते खाऊं
पैशावांचून अडे जरि कोयना !

पांच वर्षांमधें
केले नाना धंदे
हौस मोटारिची परि जाइना !

आम्ही दौरे काढूं
मेजवान्या झोडूं
गांधीबाबाचें नांव तुम्ही घ्याना !

अन्नवस्त्राविणें
गरिबांचें जिणें
बंगले, मोटारी आणि मंत्र्यांना

मी मंत्री झालों,
नवी मोटार आणुन कां हो द्या ना ?

२७ जुलै १९७२

## चहा ही चैन—

मुंबईचे अर्थमंत्रि डॉक्टर जीवराज मेहता ह्यांनीं 'चहा ही चैन आहे!' असे उद्‌गार काढले.

चहा ही चैन। द्या जनहो, सोडून!

दोन आपुले सद्‌गुणि मंत्री
कधीं चहाला स्पर्श न करिती;
दूध मात्र ते गुपचुप पीती
त्यांचे बघून। द्या कसा चहा सोडून!

मंत्र्यांनीं ह्या वीस हजारी
मोटर घ्यावी नवीन कोरी;
एक आण्याची गरिबाची परि
चहा ही चैन। द्या आधीं हिज सोडून!

खर्च होइ जो चहा पिण्याला
सांठवुनि तो ठेवा सगळा;
कररूपानें सरकाराला
सर्व देऊन। टाका अन् जगीं व्हा धन्य!

स्वच्छ नळाचें प्यावें पाणी
खावि हवा ती पोट भरोनी,
उघड्यावर अन् द्यावि 'ताणुनी'
अन्य याहून। करूं नका बापहो, चैन!

१० ऑगस्ट १९५२

## राजाजींचा उपदेश

मद्रासचे मुख्यमंत्री श्री. राजगोपालचारी यांनीं एकदां विद्यार्थ्यांना पुढीलप्रमाणें उपदेश केला होता.

*[चाल—नका टाकून जाउं]*

नका, नका मुलांनों, जाऊं नका,
कधिंहि सिनेमाला ॥ धृ० ॥

बघुनि पट ते
बुद्धी घटते
होतो साऱ्या नीतीचा चोळामोळा !

जे नको ते
भलतेसलते
होती विचार डोक्यांत गोळा !

चित्रसृष्टी
नरकपुरि ती
त्यांपेक्षां खुशाल घरिं लोळा !

स्वच्छ असू दे
अंगिं कपडे
त्या फॅशनला काडी लावुन जाळा !

आत्महत्या
करूं नका त्या
झालां नापास जरि किति वेळां !

हास्यवदनें
नित्य जगणें
केला कॉंग्रेसनें जरि घोटाळा !

भक्तिभावें
रोज खावें
गांधीवादाचें चूर्ण तोळातोळा!

१४ सप्टेंबर १९५२

## चारोळ्या

[नवकाव्य]

धोतर नेसत होते काका
तोंच निसटल्या निऱ्या करांतुन;
प्रसंग होता मोठा बांका
मीच झांकले डोळे चटकन्!

* * *

"मान मोडेल ग तुझी
किती अंबाड्याचा बोजा!"
"इश्श!" हांसून ती म्हणे
"त्यांत आहे पायमोजा!"

* * *

काल होती प र क री
घेत होतों वर करीं!
आज जातां पर करीं!
साली पळे दुरी दुरी!

२ नोव्हेंबर १९५२

## चारोळ्या

[नवकाव्य]

आगगाडींतुन जाई मुंबईला
        नवीन जोडपें। बोगदा तो आला!
गुडुप अंधार! घाबरली बाला
        घट्ट मिठी मारी आणि—शेजाऱ्याला!

*        *        *

त्यांच्या चोरट्या प्रेमाचा
        पत्ता कोणाला नव्हता!
एका पोरट्यानें केला
        साऱ्या जगांत बोभाटा!

*        *        *

जिन्यावर अंधारांत
        घाईनें ती जात होती!
केंस चुंबायला गेलों
        आलें गंगावन हातीं!

९ नोव्हेंबर १९५२

# बाळा, गो गो रे

मुंबईचे पंतप्रधान बाळासाहेब खेर ह्यांनीं आपलीं अधिकारसूत्रें गेल्या मंगळवारीं खालीं ठेवून सर्वांचा निरोप घेतला. त्या प्रसंगीं मुंबईच्या जनतेनें ह्या आपल्या 'आवडत्या बाळा'ला गायलेली अंगाई.

बाळा, गो गो रे। स्मितवदना। खेरकुलोत्पन्ना रे।
मुंबइची जनता। तव आई। गाई तुज अंगाई ॥ धृ० ॥

पायाचे धोंडे। लडिवाळा। बसवुनि का रे थकला ?।
हृदयाचा तुजला। सुकोमला। रोग म्हणोनी जडला ॥

कामाचे भारे। सांठवुनि। काढिलेस तूं दौरे।
फोटो तव हंसरे। छापुनियां। थकलीं सारीं पत्रें ॥

अघेलि आईची। बाळपणीं। चोरिलीस ना त्वां रे ?
अर्धें टिळकांचें। लुबाडिलें। नांवहि त्वां बाळा रे ॥

तरुणपणीं केल्या। वेल्हाळा। विलायतेच्या वाऱ्या,
आठवुं किति बाळा। रंगेला। गंमति तुझ्या त्या साऱ्या ॥

विलायती ब्रॅण्डी। अन् अंडीं। पचवुनि पूर्वीं सारीं।
दारुबंदीचा। वृद्धपणीं। होशी तूं कैवारी ॥

तुझिया नीतीची। शौर्याची। गाउं किती मी गाणीं ?
म्हणसि सुरीहल्ले। थांबवितां। येती दो हातांनीं ॥

गोड सदा हंसशी। परि चिडशी। संतापानें कुढशी,
कधिं न कुणा कळशी ! कारण तूं। बहुरूपी बहुभाषी ॥

धन्य तुझी बाळा। खरोखरी। राष्ट्रावरची भक्ती
श्रीशिवरायाची। टिळकांची। नाहिं दिली तूं सुट्टी ॥

बलसाडामाजीं मुरारजी । दोस्त तुझा तो गाजी ।
पडला, गडगडला । अब्रूची । झाली तुमच्या भाजी ॥

सूज्ञपणें आतां । दोघेही । जा झोंपीं लवलाही ।
तुमच्या खेळांनीं । जनता ही । झाली त्राही त्राही ॥

३ फेब्रुवारी १९५२

## रसिकांस चेतवणी

झेंडूचीं रसिका, फुलें जमवुनी देतों तुझ्या हीं करीं,
घे प्रेमें अथवा पदीं तुडव जा ! जें वाटतें तें करीं !
रागानें चुरगाळलींस जरि हीं पुष्पें कधीं त्वां बरें—
केव्हांही विसरूं नकोस तळिंचें खाण्या परी खोबरें !

# प्रश्नपत्रिका

जरुरी—प्रकाशित काव्यसंग्रहाच्या प्रत्येक जनकास आपलें सदर अपत्य कोठल्यातरी विश्वविद्यालयीन परीक्षेसाठीं तयारी करणाऱ्या उमेदवारांच्या मानगुटीवर खास बसणार असा आत्मविश्वास वाटत असतो. 'झेंडूच्या फुलां'च्या कर्त्यासही तसें न वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. पैगंबरनिवासी बच्चा–इ–साकूच्या राजवटींत सदर 'काव्यग्रंथ' कंदाहार युनिव्हर्सिटींत बी. ए. व एम. ए. च्या परीक्षेस नेमला जाण्याचा अत्यंत संभव होता. पण आतां–हाय! तथापि, या संग्रहांतील कांहीं निवडक कविता मुंबई युनिव्हर्सिटींत पर्शियन या विषयाच्या अभ्यासक्रमांत नेमल्या जाणार असल्याबद्दलची खाजगी कुणकुण आमच्या कानावर आलेली आहे. असें जर खरें असेल तर अभ्यासुक विद्यार्थ्यांच्या फायद्यासाठीं सदर काव्यसंग्रहांतील कांहीं महत्त्वाच्या प्रकरणावर सूचक प्रश्न देऊन ठेविले तर तें खास अस्थानीं होणार नाहीं! निदान मागाहून एखाद्या 'टिप्पणिका प्रकाशक मंडळा'नें सदर पुस्तकाचा परीक्षेसाठीं पंचनामा मांडण्यापेक्षां कर्त्याचे हातूनच त्याचें कांहीं बरेंवाईट झालेलें बरें!

१. (अ) जडजंबालांच्या 'एकच वाक्या'चें सविस्तर पृथक्करण करून त्यांतील निरर्थक विशेषणांची यादी द्या. सदर 'वाक्या'चा व ज्ञानोबारायाच्या 'पसायदाना'चा कोठल्याही तऱ्हेनें संबंध लागतो असें दाखवून दिल्यास संपूर्ण प्रश्नाचे गुण बहाल करण्यांत येतील. वेळीं अवेळीं–कारण असो वा नसो–ज्ञानोबांच्या पसायदानाची अशी पाणपोई मांडल्यानें त्या ब्रह्मीभूत महात्म्याची बदनामी होते असें कित्येक रसिकांचें मत आहे. याविषयीं तुमचें काय म्हणणें आहे? (ब) कवि आणि चोर या दोघांमध्यें कोणत्या बाबतींत साम्य असतें अगर असूं शकतें? काव्य व चौर्य या दोन्ही कलांत ज्यांचा हातखंडा आहे अशा कांहीं ठळक कवींचीं नांवें द्या. (या प्रश्नाचें उत्तर देण्यास जादा पुरवणी-पत्रिका घेण्याची परवानगी आहे.)

२. महाराष्ट्र-शारदेच्या पवित्र मंदिरांत 'कादरखां' नामक पठाण घुसविल्याचें 'महापातक' केल्याबद्दल त्याच मंदिरास जोडून असलेल्या अन्नछत्रांतील कांहीं पंक्ति–पठाण 'बहोत गरम' झालेले आहेत. त्याचीं कारणें कोणतीं?

३. आरंभीं गळ्यांत गळा घालून काव्याचा 'रसगुल्ला' चाखीत बसणारे कांहीं शाहीर चार दिवसांनीं एकमेकांच्या छातीवर बसल्याशिवाय रहात नाहींत असें म्हणतात. तुमचा काय अनुभव आहे?

४. वाटेवर पडलेल्या कोणकोणत्या गोष्टींची वाटमारी करण्यास कवींना परवानगी आहे ?

५. 'सुतक' हें काय प्रकरण आहे ? वाटेल त्या विषयावर दोन मिनिटांत एकादें सुतक बनवून दाखवा. मात्र तें लिहीत असतांना सुतकी चेहरा करूं नका !

६. मोहरममध्यें कवीनें कोणती मर्दुमकी गाजविली ? 'हुसेन आणि हासन्' कवीला आठवतांच त्याच्या डोळ्यांत 'टचकन् पाणी' कां आलें ? इब्राहिम व याकुब यांचीं थोडक्यांत चरित्रें द्या ?

७. प्रियेच्या डोळ्यांतील अश्रू पाहून, कविवल्लभ कळवळतो व ते अश्रू ज्या 'दुष्टानें' तिच्या डोळ्यांतून काढले त्याचा सूड घेण्याची भाषा बोलूं लागतो; पण अखेर प्रिया 'विनयानें' त्याला सांगते. "लागोनि नाथ, विडिचा अपुल्याच धूर ! आला मदीय नयनीं अजि अश्रुपूर" या कथानकावर 'सखे, बोलबोल' हा मथळा देऊन एक कविता रचा. सदर कवितेची आणि या पुस्तकांतील 'सखे, बोल-चोल !' ची विस्तृत तुलना करा.

८. रस्त्यावरील विडीचें थोटूक सांपडलें असतां तें बेमालूम टोपींत लपविणारा कवि आणि तेथल्या तेथें शिलगावून 'पिणारा' कवि या दोहोंपैकीं श्रेष्ठ कोण ? तुम्हांला असें थोटुक सांपडलें असतें तर तुम्ही काय केलें असतें ? त्यावर कविता केली असती; का तें फुंकून खलास केलें असतें ?

९. पुण्यांतील कुठल्याशा 'दुधाच्या गुत्त्यां'तील आटीव दुधाच्या कढईत पाल पडून तिचा भरपूर अर्क त्या दुधांत मिसळल्यामुळें त्याच्या प्राशनानें श्राद्धास बोलावलेल्या ब्राह्मणांची संब्रंध पंगतच्या पंगत धारातीर्थी पतन पावून पितरांच्या भेटीला जाते, ह्या अत्यंत करुण विषयावर कविता करा. 'ब्राह्मण भडभड ओकून धडधड धरणीवर लोळत आहेत'—हा प्रसंग ध्वनिवाचक शब्दांत कौशल्यानें रंगवा.

१०. 'पाय घसरला तर' काय होईल असें तुम्हांस वाटतें ? पुण्यांत उन्हाळ्यांत किंवा पावसाळ्यांत पाय घसरण्याचीं कोणतीं ठिकाणें आहेत ? अशा एका ठिकाणीं पाय घसरल्यामुळें एक कवि मरून पडला आहे अशी कल्पना करून त्या विषयावरून एक 'पांडव-दिडकी' किंवा 'कौरव-पावली' वृत्तांत कविता करा.

११. "तुंगभद्रा–मिथुनराशी–राक्षसगणी" वृत्ताचीं लक्षणें द्या. श्यामल 'कितीही जरी वाढली' तरी कवीस 'छोकरी'प्रमाणें वाटते हें कसें? कवि स्वतःची माजूम, हिङ्ग, भाङ्ग, बेवडा, कांदे—बटाटे—भात इ० पदार्थांशीं तुलना करतो, यावरून कवीच्या धंद्यासंबंधीं तुम्ही कांहीं तर्क बांधूं शकाल काय? 'कलंदरी फकीर', 'थरपार्करी मैदान', 'मुर्गी बिन्यानी', 'फकीरी मूर्ति', 'छुपा पापा' 'माडगें गाडगें या शब्दांवर थोडक्यांत टिपणें लिहा.

१२. 'करुणरसा'तील 'येरू' नवीन धंदा सांपडत नाहीं म्हणून तळमळत आहे. त्याला करतां येतील असे दोनचार धंदे सुचवा. यावरून "आपल्या देशांत धंदेशिक्षणाची पायमल्ली चालली आहे" या सार्वत्रिक समजुतीला कितपत पुष्टी मिळते? "सुनीत या शब्दाची निर्मिति हा अर्वाचीन मराठी वाङ्मयांतील कोलंबसी किंमतीचा शोध आहे!" असें 'ताजी बातमी!' पत्राचे एक विद्वान लेखक म्हणतात. या विधानाची सांगोपांग चर्चा करा. (या प्रश्नाचें सर्वोत्कृष्ट उत्तर 'ताजी बातमी'मध्यें छापण्यांत येईल!) दोन संतकवि एकमेकांस भेटतांच 'मस्तकावघ्राण' अगर 'कपाळाचें चुंबन' घेतात. कपोलचुंबनापेक्षां कपाळचुंबनानें अधिक प्रेम व्यक्त होतें असें म्हणतात. खरें आहे का? अनुभव असेल तरच उत्तर द्यावें.

१३. चार मोरपंखें अंगाला चिकटवून 'मोर' बनूं पहाणारा डोमकावळा व स्वतःच्या बिनरंगी धोतरेवजा फुलांना हळद फासटून सोनचांफा बनूं पहाणारा गांवचांफा यांत तुम्हांस कांहीं साम्य दिसून येतें का?

१४. 'अरुण' पद्धतीनें 'तुटलेला तारा' या विषयावर एक उत्प्रेक्षांची गोधडी विणा. 'तुटलेला तारा' हा विषय असा आहे कीं, त्यावर वाटेल त्याला अकलेचे तारे तोडतां येतील. नमुन्यादाखल एका महाकवीची या विषया-वरील एक उत्प्रेक्षा दाखवितों. "शुक्राचार्य स्वर्गांत आपल्या मेजावर दिवा ठेवून वाचावयास बसले आहेत. इतक्यांत कच नाहींसा झाला म्हणून रागानें वेडी झालेली देवयानी तेथें येते व त्या दिव्याला लाथ मारून खालीं पाडते! तोच दिवा हा का!"—अकलेचा दिवा इतका भडकलेला तुमच्या पाहण्यांत आहे का?

१५. 'प्रेमाचा गुलकंद' चाखण्याची तुमच्यावर कधीं पाळी आली आहे काय? राजीखुषीनें व अक्कलहुषारीनें उत्तर द्या.

१६. 'कानगुजला' या शब्दाची व्युत्पत्ति द्या.

१७. रामेश्वराच्या देवळांत गालिचे पहावयाला तरुण लोक कां जातात ? सुंदरी-दर्शनानें कवीला 'कसकसें' वाटूं लागलें म्हणजे काय झालें ? तो वाटेंत 'चारदां पडतांच' कुणी काय तर्क बांधला ?

१८. रस्त्यांतून एकादी नीटनेटकी अंगना जात असेल तर पथिकाचें काय कर्तव्य आहे ? सार्वजनिक वाचनालयांतील नियतकालिकामधील चित्रें व कूपनें कापून आणण्याचा प्रत्येक मेंबराचा जन्मसिद्ध हक्क आहे किंवा नाहीं ? दुसऱ्यांचीं पत्रें चोरुन वाचणें किंवा संभाषणें चोरून ऐकणें हें प्रत्येक आर्यपुत्राचें कर्तव्य आहे किंवा कसें ? दारांच्या फटी किंवा झरोके यांचा आपण काय उपयोग करावा ?

१९. 'कवडा' कोणाला म्हणावें ? तुमच्या गांवांतील कवड्यांची यादी करा. अशा कवड्यांच्या काव्यसंग्रहाला 'कवड्यांची माळ' हें नांव दिलें तर तें कितपत उचित होईल ?

२०. (अ) नि, अन्, व, छट्, ह्यः ह्यः, इश्श इत्यादि शब्द सढळ हातानें वापरून एकादी कविता करा, (ब) शुद्धलेखन-मंडळानें परसवर्ण वापरण्याच्या विरुद्ध मत दिल्याकारणानें 'ङ' 'ञ' इ. हिरमुसलेल्या अनुनासिकांची सदर मंडळास उद्देशून एखादी काव्यमय कैफियत रचा !

# झेंडूचीं फुलें

वाहवा ! वाहवा ! झेंडू हा !
सुंदर किति तरि सपीत हा !
( थोडासा फेरफार करून )

संग्राहक

श्री. दिनकर गंगाधर केळकर.

प्रकाशक

सारस्वत प्रकाशक मंडळ पुणें.

१९२५

किंमत ४ आणे.

पहिल्या आवृत्तीचे मुखपृष्ठ

झेंडू पुस्तक-फार्मसी—पहिलें पुस्तक

'केशवकुमार'कृत

# झेंडूचीं फुलें

संपादक

दिनकर गंगाधर केळकर

[ सुधारून वाढविलेली द्वितीयावृत्ति ]

दसरा १९३०

किंमत १० आणे

दुसऱ्या आवृत्तीचे पहिले पृष्ठ

## १. चार प्रास्ताविक शब्द

[दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना]

हें जग गुणदोषांचें मिश्रण आहे. यांतील दोषांचें प्रमाण कमी करून गुणांचा उत्कर्ष करण्याविषयीं सज्जनांचा सदैव प्रयत्न चालू असतो. धर्मक्षेत्रांत अराजक उत्पन्न झाल्यास धर्मसंस्थापनेकरितां प्रत्यक्ष परमेश्वर अवतरतो. राजकीय व सामाजिक प्रदेशांत कोणीं पुंडाई माजविल्यास क्षत्रिय वीर व खंदे समाजसुधारक पुढें सरसावतात व इष्ट फेरफार घडवून आणतात. वाङ्मयाच्या राज्यांत बंडाळी उत्पन्न झाल्यास तिचा समाचार घेणारे पराक्रमी टीकाकार उत्पन्न होतात व ते शारदेच्या उज्ज्वल सिंहासनाचें पावित्र्य व वैभव यांचें मर्दुमकीनें रक्षण करितात.

अपराध आणि शिक्षा ही जोडी मानवांच्या उत्पत्तीइतकीच प्राचीन आहे. हिला होणारें शोभन अपत्य म्हणजे सद्भाव, सदाचार किंवा सुविचार हें होय. वाङ्मयक्षेत्रांत टीकाकार हे न्यायाधीश व दोषदर्शन ही शिक्षा असते. अर्थात् ही शिक्षा अपराध्याच्या मनाला व बुद्धीला असते. दोषदर्शनाचें काम इष्ट व आवश्यक असतें आणि तें सर्व कालीं थोड्याबहुत प्रमाणावर व एखाद्या विशिष्ट रीतीनें चालू असतेंच. 'निंदकाचें घर असावें शेजारीं' या एका शूद्र महाकवीच्या लघुवचनांत केवढा विशाल अर्थ भरलेला आहे! यांतील 'निंदक' या शब्दाला निंदाव्यंजक अर्थ नसून त्याचा 'दोषदर्शनकार' असा चांगला अर्थ आहे. तसेंच वरील उक्तींत 'असावें' हें महत्त्वाचें पद आहे. त्यानें दोषदर्शनाची आवश्यकता व सुफलप्रदता सुचविली आहे.

वाङ्मयांतील अपराध म्हणजे अनौचित्य होय. वर्ण, शब्द, रचना, शैली, विचार, कल्पना, भावना इत्यादिकांना कमीपणा आणणाऱ्या जेवढ्या गोष्टी त्या साऱ्या 'अनौचित्य' या एका नांवाखालीं येतात. मम्मट, क्षेमेंद्र, जगन्नाथ, राघवभट्ट, मल्लिनाथ वगैरे विदग्ध संस्कृत आलंकारिकांनीं औचित्यचर्चा थोडीफार केली आहे. इंग्रजी भाषेंत टीकेचें एक स्वतंत्र, प्रगल्भ व विस्तृत शास्त्रच तयार झालेलें आहे. त्यांत यथेच्छ व यथासंभव अवगाहन करून आपल्या महाराष्ट्रांत चिपळूणकरद्वय, गुंजीकर, वामन दाजी ओक, हरिपंत पंडित, महाजनी, टिळक, आगरकर, वैद्य, परांजपे, कोल्हटकर, केळकरप्रभृति वाङ्मय-टीकाकार तयार झाले. त्यांचे टीकालेख महाराष्ट्र साहित्यास उपकारक आहेत.

प्रकृति–भेदानें टीकाकारांचे दोन मुख्य भेद होतात; एक मवाळ टीकाकारांचा प्रकार व दुसरा जहालांचा. वरील यादींत दोन्ही प्रकारचे टीकाकार असून कांहीं

सव्यसाचीही आहेत. विषदिग्ध वाग्बाणांनीं शत्रूस नेस्तनाबूद करण्याला पराक्रम लागतोच, तथापि प्रतिपक्ष्याला ताळ्यावर आणण्याला मृदु अस्त्र पुष्कळ वेळां अधिक समर्थ असतें. परंतु हें अस्त्र योजणाऱ्या वीराच्या अंगीं सहिष्णुता, अनुकंपा, दोषशुद्धीची खरी इच्छा व समंजस बुद्धि या बहुमोल व दुर्मिळ गोष्टी लागतात. असा सहृदय विद्वान् टीकाकार मिळणें ग्रंथकाराचें व वाचकांचेंही भाग्य होय. तथापि टीकाकारांकडून आपल्या ग्रंथाची अजीबात उपेक्षा होणें ही गोष्ट लेखकाला अत्यंत अपमानाची व निराशाजनक वाटते. यापेक्षां तो टीकाकाराचे कठोर प्रहार सहन करण्याला तयार होतो. कारण टीकेच्या वादळांत निदान आपलें आणि आपल्या ग्रंथाचें नांव तरी गिरक्या खात असल्याचा मान त्याच्या पदरांत पडतो!

मृदु टीकास्त्र मोठें प्रभावशाली असतें. प्राणघातक तोफा, विषारी बाण, तीव्र भाले, काळजाला घरें पाडणारे शब्द व मनोभंग करणारी वचनें यांना न साधणारीं कामें कित्येक प्रसंगीं मृदुल टीकेनें केलेलीं आहेत. विनोदगर्भ उपहास हा मृदु टीकेचा प्राण किंवा आत्मा आहे. उपहासाला संस्कृतांत विडंबन हें मोठें सुंदर नांव आहे. याला मराठींत स्थूलमानानें थट्टा, फजिती, टर, रेवडी अशांसारखीं नांवें देतां येतील. वक्रोक्ति, अतिशयोक्ति, व्याज-स्तुति, अन्योक्ति, असंगति, छेकापह्नुति, दृष्टान्त, विरोध, विषम इत्यादि अलंकारांचा अवलंब करून विडंबनाचा उत्तम परिपोष करतां येतो. असंगति हा धर्म हास्यरसाचें बीज असल्यानें व उपहासाचें फलही हास्यरस असल्यानें हास्यरसाची सर्व सामग्री उपहासाच्या उपयोगी पडते. विडंबित व्यक्तीला आपला उपहास वाचून गुदगुल्या व्हाव्या व आपले दोष पटून ते सुधारण्याची इच्छा व्हावी, तसेंच टीका वाचणारालाही टीकाविषयक व्यक्तीविषयीं तिरस्कार न वाटतां अनुकंपा किंवा कींव उत्पन्न व्हावी, म्हणजे त्या विडंबनाचा किंवा उपहासाचा परम उत्कर्ष झाला असें खचित समजावें. अंगाला शस्त्र न लावतां त्यांतील दूषित रक्त मात्र बाहेर काढणें हें जितकें कठिण तितकेंच टीकाविषयीभूत कवीला व टीकावाचकांस बिलकुल न दुखवितां, एवढेंच नव्हे तर उलट हंसवून सोडून, मृदु टीकेनें काव्यसंशोधन करणें, कठिण आहे.

'झेंडूचीं फुलें' या विनोदी काव्याच्या सुधारून वाढविलेल्या दुसऱ्या आवृत्तीची एक प्रत आमच्याकडे प्रस्तावनेकरितां आली असल्यामुळें टीकाविषयक सामान्य उपन्यास वरतीं थोडक्यांत करावासा वाटला. पुण्य-पुरुषांच्याप्रमाणें सत्काव्यालाही पुनर्जन्माची भीति नसते. असत्काव्याचें विडंबन करण्याचें महापातक केल्यामुळेंच कीं काय 'झेंडूच्या फुलां'स पुनर्जन्माची शिक्षा झाली! परंतु

हें वाचकवर्गाच्या कृपादृष्टीचें फल असावें असें अनुमान केल्यास तें चुकीचें होईल असें वाटत नाहीं. व्याकरणानें झेंडूच्या फुलांना समानलिंगी बनविलें असलें तरी त्या फुलांनीं बराच पुरुषार्थ गाजविल्याचा प्रत्यय येत आहे! कविताकामिनी एवढ्याचकरितां वैयाकरणावर रुष्ट होऊन फुलांचें परोपरीनें कौतुक करणाऱ्या अलंकारविशारद कविवरांवर प्रेमोत्फुल्ल कटाक्षांची वृष्टि करीत असते. 'झेंडूचीं फुलें' पुन्हां जन्माला आलीं यामुळें त्यांच्या जनकास पुत्रजन्ममहोत्सवाचा द्विगुणित आनंद होत असला पाहिजे. रा. प्रल्हाद केशव अत्रे ऊर्फ केशवकुमार हें केवळ प्रस्तुतच्या पुस्तकाचेच जनक नसून त्यांचीं इतर गद्य-पद्यात्मक लहान-मोठीं अपत्यें महाराष्ट्रांत इतस्ततः बागडत आहेत. त्यांच्या बालोचित मनोहर लीलांवरून रा. अत्रे यांचें कवित्व व विनोदशीलत्व महाराष्ट्रीय काव्यवाचकांच्या चांगलें परिचयाचें झालें आहे. 'मनोरमे'ला मनोरम करण्याचा त्यांचा उद्यम कोणास ठाऊक नाहीं! रा. अत्रे सुसंस्कृत पदवीधर असून विलायतेहून शिक्षण-शास्त्री होऊन आल्यापासून ते शाणोल्लीढ मण्याप्रमाणें पुण्याच्या शैक्षणिक वातावरणांत चमकूं लागले आहेत. विनोद हा गुण त्यांच्यामध्यें स्वभावसिद्ध आहे. विडंबन करावयाला लागणारें सगळें साहित्य त्यांस अनुकूल आहे. या गुणांचा उपयोग करण्याची त्यांना हौस आहे. या हौसेची व रसिक उद्यमाची गांठ पडली. या अनुरूप दंपतीला गोंडस व बाळसेदार अपत्य झालें. तींच हीं 'झेंडूचीं फुलें!'

परिमलाच्या बाबतींत हीं फुलें मालती, मोगरा, जाई, चंपक, बकुल, निशिगंध, पारिजात इत्यादि अभिजात पुष्पांशेजारीं बसूं शकत नाहींत; तथापि तीं वर्णसौष्ठव व रचनासौंदर्य या गुणांत कोणाला हार जातील असें वाटत नाहीं. शिवाय विजयादशमीच्या दिवशीं विजयी वाजिराजींच्या कंठांत, पोळ्याच्या अमावास्येला नंदिकेश्वराच्या शृंगांवर व मानेवर, नवरात्रांत दुर्गादेवीच्या उत्तमांगावर लोंबणाऱ्या हारांत व विजयोत्सवप्रसंगीं उभारल्या जाणाऱ्या उत्तुंग तोरणांवर प्रतिष्ठेनें मिरविण्याचा मान यांनाच मिळतो. प्रस्तुत पुस्तकाला 'झेंडूचीं फुलें' हें नांव देण्यांत कवीची शालीनता व्यक्त होत आहे. रत्नावलि, मणिमाला, मौक्तिकमाला अशांसारखें एखादें भपकेदार नांव रा. अत्रे यांच्या अक्षय व अखंड शब्दटंकणशाळेंतून बाहेर पडणें मुळींच कठिण नव्हतें. झेंडूच्या फुलांची कशीही संभावना झाली तरी हरकत नाहीं; तथापि बुडाशीं खोबरें आहे तें तरी वाचकांच्या पदरांत पडावें अशी त्यांची इच्छा प्रस्तुत पुस्तकाच्या शेवटच्या 'रसिकांस चेतवणी' या पद्यांत व्यक्त झाली आहे. यावरून हीं 'झेंडूचीं फुलें' तयार करण्यांत त्यांचा काय उद्देश होता तें स्पष्ट होत आहे.

प्रस्तुत पुस्तकाच्या अंतरंगांत प्रवेश करण्यापूर्वी तें तयार करतेवेळीं रा. अत्रे यांच्या दृष्टीपुढें कोणती सृष्टि होती याचा विचार करणें अप्रस्तुत होणार नाहीं; एवढेंच नव्हे, तर तो मनोरंजक व उद्‌बोधकही होईल असा भरंवसा वाटतो. गेल्या दहा-पंधरा वर्षांत महाराष्ट्रांत व विशेषतः पुण्यांत मराठी वाङ्मयात्मक व त्यांतूनही केवळ मराठी काव्यक्षेत्रांत, झालेल्या कित्येक घडामोडींकडे व परिवर्तनांकडे रा. अत्रे यांचें लक्ष वेधलेलें दिसतें. आत्मप्रतिष्ठेकरतां हपापलेल्या कांहीं लेखकांनीं सरस्वतीच्या नांवावर डोलारे उभारण्याचा खटाटोप कसा केला व त्यांचे अनभिषिक्त अध्यक्ष बनण्याकरितां कशीं रणें माजविलीं याची वार्ता रा. अत्रे यांस लागली असावी. हीं सरस्वतीभवनें कांहीं दिवस कित्येक लब्धप्रतिष्ठ व रिकामटेकड्या साहित्यकिंकरांनीं खाण्या-खिदळण्याचे अड्डे बनविलीं होतीं ही गोष्ट रा. अत्रे यांस महशूर झाली असेल. कधीं कधीं कांहीं साहित्यभक्तांच्या 'अहोरूपमहो ध्वनिः'च्या ध्वनीनें, तर कधीं कधीं त्यांच्यामधील परस्परस्पर्धेनें उडालेल्या खटक्यांच्या प्रतिध्वनीनें, सदर सरस्वतीमहाल निनादित झाले होते. हा वृत्तान्त रा. अत्रे यांच्या श्रवणपथावर जाऊन थडकला असेल. तनुनिर्वाहाच्या उदात्त हेतूनें प्रेरित होऊ कित्येक शारदाभक्तांनीं उष्ट्या पत्रावळींचीं चोपडीं तयार करून आपल्या परमपूज्य आराध्यदेवतेला त्यांचा भक्तिरसमिश्र रुचिकर नैवेद्य समर्पण करण्याचे गंभीर समारंभ अवडंबरपूर्वक साजरे केले, हेंही रा. अत्रे यांस कळल्यावांचून राहिलें नसेल. सदुद्यमाच्या अभावीं कित्येक दिवस मयन्त्या व जयंत्या हुडकून काढून किंवा निर्माण करून प्रचंड घोषणेमध्यें मंदिरांचें अस्तित्व पुकारण्याचा कित्येक भक्तांनीं भगीरथ यत्न केला हें वर्तमान रा. अत्रे यांस श्रुत झालें असेल. काव्यकारांचीं मंडलावर मंडलें जन्मास येऊन त्यांत चुरशीचे सामने सुरू झाले आणि काव्यवीरांच्या शस्त्रांच्या खणखणाटांतून आतां ठिणग्या बाहेर पडून धारातीर्थांत ते सुस्तस्नात होतात कीं काय, अशा शंकेनें सूर्यमंडल, बुधमंडल व रंभाकुचमंडलही अकांड कंपित होण्याचा प्रसंग येऊन ठेपला! अंतरिक्षांतील वायुमार्गात आणि आकाशगंगेच्या स्रोताबरोबर, पसरलेली ही किंवदन्ती पुण्यांतल्या पुण्यांत रा. अत्रे यांस कळली नसेल हें संभवत नाहीं. एकदां तीनचार लेखकांनीं एक अल्पभांडवली, बिनअक्कली, शून्यश्रमाचें व बहुमूल्योत्पादक एक पुस्तक समाईक नफ्याच्या लोभानें काढण्याचा कारखाना सुरू केला. त्यांत पुढें छापखान्याच्या बिलाची भानगड उपस्थित झाल्यामुळें छापलेल्या पुस्तकाची हिसकाहिसक सुरू झाली व छापखानेवाला आणि पुस्तकाचे पातीदार यांमध्यें जोराचा तंटा उपस्थित झाला. हें प्रकरण बरेच दिवस पुण्यापासून नागपुरापर्यंत कधीं पंजाबमेलच्या गतीनें तर कधीं बैलगाडीच्या वेगानें

प्रवास करीत होतें. ही गोष्ट रा. अत्रे यांस अज्ञात नसावी. एक कवि आपल्या उपकारकर्त्यावर उलटून कृतघ्नपणानें काव्यमिषानें त्याची बदनामी करतो व न्यायकोर्टीत अपराधी ठरून दंडाला पात्र होतो; तर दुसरा कोणी एक मुंबईत एका बँकेवर डल्ला मारून नांव बदलून दूरच्या एका गांवीं ग्रंथकर्तृत्वाच्या आसनावर अधिष्ठित होऊं लागतो तोंच त्यास चतुर्भुज होण्याचा प्रसंग येतो व तो गुन्हेगार ठरून बिनभाड्याच्या घरांत कांहीं महिने एकांतवासांत कंठितो! या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयसेवकांच्या कथा रा. अत्रे यांच्या कोमल मनाला पीडा देत असल्या पाहिजेत. चार थोर लोकांचा आधार असल्याशिवाय आपण उभारलेल्या सारस्वत–मंदिराला स्थैर्य येणार नाहीं असा अनुभवानें उत्पन्न होणारा शहाणपणाचा विचार कांहीं वाङ्मयसेवकांच्या मनांत येऊन त्यांनीं अलीकडे कांहीं प्रसिद्ध विद्वान् वाङ्मयभक्तांची कास धरून आपल्या संस्था तगविण्याचे केलेले प्रयत्नही रा. अत्रे यांस श्रुत असतील. अशा प्रकारें कित्येक कवि व लेखक यांचीं विचित्र चरित्रें आणि लीला रा. अत्रे यांच्या अंतश्चक्षूंपुढून चलच्चित्रपटाप्रमाणें गेल्या असाव्या, असा तर्क होतो. काव्यरचनाविषयक विविध अनौचित्यप्रसंगांनीं त्यांच्या मनांत गर्दी उडवून दिली असावी. कवि हा प्राणी सच्छील, सत्त्वगुणसंपन्न, प्रेमळ, सौंदर्यपक्षपाती व शारदेचा एकान्त भक्त असतो या कल्पनेशीं अगदीं विसंवादी असे कित्येक कवि आणि वाङ्मयोपासक पाहून रा. अत्रे यांचें मन आश्चर्य, खेद व अनुकंपा यांनीं भरून गेलें असावें. अशा मनःस्थितींत 'झेंडूचीं फुलें' हें विडंबनकाव्य निर्माण झालें असावें असें वाटतें.

आतां प्रस्तुत पुस्तकाच्या अंतर्बाह्य स्वरूपाकडे थोडेंसें वळूं. हें पुस्तक षोडशपत्री क्राऊन आकाराच्या अवघ्या पाउणशें पृष्ठांचें आहे. यांत सुमारें पंचवीस प्रकरणें आहेत. त्यांत पहिलें गद्यात्मक व बाकीचीं सर्व पद्यात्मक आहेत. प्रत्येक प्रकरणांत विनोद आहेच; परंतु प्रत्येकांत उपहास आहेच असें मात्र नाहीं. विचित्र कविस्वभाव व अनुचित कविकृति हे विडंबनाचें विषय आहेत. कित्येक प्रकरणें केवळ काव्यविनोदार्थ रचिलीं आहेत. कविकृतीचें विडंबन यांत काव्यरूपानेंच केलें आहे, हा या पुस्तकाचा विशेष आहे. या बाबतींत हा असा प्रयत्न आमच्या माहितीप्रमाणें पहिलाच आणि म्हणूनच एका दृष्टींनें अपूर्व आहे. नाट्यकलारुक्कुठार एकाच नाट्यकाराच्या नाट्यकृतीवर चालविला गेल्याचें स्मरतें. प्रस्तुत प्रयत्न कित्येक आधुनिक मराठी कवींच्या कलाकृतीच्या कांहीं अंगांवर उभारला आहे.

उपहसित व्यक्ति किंवा कृति वाचकांना पटली म्हणजे उपहास सफल झाला व विडंबनकार कवीचें काम फत्ते झालें. प्रस्तुत पुस्तकांतले विडंबनविषय प्रायः

मराठी काव्यभक्तांच्या परिचयांतले आहेत. त्यामुळें ते वाचतांक्षणींच विडंबित व्यक्ति अगर कृति एकदम डोळ्यांपुढें उभी राहून हंसें कोसळतें! आरंभींचें 'जडजंबाल' याचें 'एकच वाक्य' पहा. जडजंबाल हा शब्द ऐकतांच त्यावरुन ध्वनित होणारा दोषसमुच्चय मनश्चक्षूंपुढें उभा राहतो. त्याचें 'एकच वाक्य' वाचतांच तो दोषराशी चर्मचक्षूंचा व बुद्धीचा विषय होतो. जडजंबाल पंडिताच्या प्रदीर्घ व बोजड 'एकच वाक्यांत' अनेक काव्यदोष खचून भरलेले आहेत. मम्मटाचें सगळें दोषप्रकरण यांत उदाहृत झालें आहे असें म्हटलें तर अत्युक्ति होणार नाहीं. जडजंबालाचें भाषण किंवा लेखन ज्यांनीं ऐकलें किंवा पाहिलें असेल त्यांना 'एकच वाक्य' यामध्यें जडजंबाल मूर्तिमंत उतरलेला दिसेल यांत शंका नाहीं. 'चांफा' या कवितेचा कटाक्षही जडजंबालावरच आहे. 'श्यामले' या प्रकरणांतील मौज कांहीं और आहे! मराठी काव्यवाङ्मयसीमेंत उर्दूचें फाजील प्रस्थ माजवून ज्यांनीं हैदोस मांडला आहे, अशा एका पर्शियन साहित्यशास्त्र्याच्या 'श्यामले'ची यांत विडंबना आहे. विडंबनाचे सर्व प्रकार या कवितेंत अवतीर्ण झाले आहेत. विडंबनकारांची ही कामगिरी खरोखरच तारीफ करण्यासारखी आहे. 'मोहोरमधील मर्दुमकी' या प्रकरणांतही थोडासा तोच उपहासप्रकार आढळतो. एकदां एका आधुनिक काव्यलेखकाचें त्याच्या चाहात्यांनीं इतकें कांहीं स्तोम माजविलें कीं, त्या बिचाऱ्या कवीला खरोखरीच वाटूं लागलें कीं, आपण कोणीतरी असामान्य विभूति आहोंत. त्याचा परिणाम असा झाला कीं, तो कवि, आपला पद्यें रचण्याचा नेहमींचा उद्योग सोडून, काव्यशास्त्रमतंगजांशीं स्पर्धा करूं लागला! त्यास एक नवरसमंजिरी निर्माण करण्याची हुक्की आली. पण हा त्याचा प्रयत्न खऱ्या रसिक पंडितांच्या उपहासास मात्र पात्र झाला! या रसशून्य रसमंजिरीवर कटाक्ष ठेवून या पुस्तकांत 'नवरसमंजिरी'–प्रकरण घातलें आहे. हें फार मधुर आहे. यांतील करुणांत प्रतिबिंबित झालेला करुणास्पद, बहुरूपी, अहंमन्य, लेखकव्रुव; बीभत्सांत गटंगळ्या खाणारा प्रियागुणस्मरणीबहादर कवि; व वत्सलरसाच्या डोहांत डुंबून झुंडाग्रांनीं बाललीला करणारे वृद्धतरुण वाङ्मयमातंग यांचीं चित्रें प्रेक्षणीय आहेत. एका फोटोच्या प्रसंगीं अग्रस्थान पटकवण्याकरितां अहमहमिकेनें धडपणारे कित्येक कविकुंजर पद्यावरुन गद्यावर व गद्यावरुन गुद्द्यांवर कसे घसरत गेले, या प्रसंगाचा रौद्ररसांत सुंदर आविर्भाव झाला आहे. 'सखे बोल बोल!' ही कविताही वरील पद्यकारासच अनुलक्षून लिहिली आहे. 'कषायपेयपात्रपतितमाक्षिकेप्रत' ही कविता पुण्यांतील एका वृद्ध व विद्वान परंतु क्लिष्टकाव्यरचनाकुशल कविशार्दूलाची थट्टा आहे, हें सहज लक्षांत येईल. काव्याचा मथळा, आरंभ व शेवट,

तशीच ओजःसंपन्न काव्यशैली या सर्व गोष्टी विडंबनांत खुलून दिसत आहेत. विषयचमत्कृतीनें व विषयाच्या विनोदप्रचुर विवरणपद्धतीनें या कवितेला उठावदारपणा आला आहे. क्षुद्र विषयाला अगडबंब स्वरूप देण्याच्या वृत्तीचा उपहास करण्याकरितां 'पाय घसरला तर' या प्रकरणाचा अवतार झाला आहे. 'कवीचीं विरामचिन्हें', 'आम्ही कोण?', 'पाहुणे', 'मनाचे श्लोक' या कविता केवळ काव्यविनोदार्थ रचिल्या असून त्यांत मूळांतल्याहून भिन्न परंतु सुंदर व मनोरम कल्पना ग्रथित केल्या आहेत. 'रस्त्यावर पडलेलें विडीचें थोटूक' यांत एकाच विषयावर झालेल्या दोन सुनीतांची हजेरी घेतली आहे. 'कवि आणि चोर' 'प्रेमाचा गुलकुंद', 'कानगुजला' इत्यादि चटका लावून सोडणाऱ्या कविता कित्येक कवींच्या अधम भावना व रचना यांचा समाचार घेणाऱ्या आहेत. या पुस्तकांत पृष्ठांच्या खालीं प्रकरणबोधक व अन्यही टीपा दिल्या आहेत. त्या फार मार्मिक असून त्यांतही विनोदाच्या छटा दिसून येतात.

कवीला विडंबनकाव्यांतील विषय प्रच्छन्नच ठेवावा लागतो; किंबहुना अशा गोपनामध्येंच विडंबनाचा सगळा रंग भरलेला असतो. गौप्य वस्तूची परिस्फुटता म्हणजे बेरंग प्रसंग. विडंबनकाव्याच्या प्रस्तावनालेखकासही ही मर्यादा पाळावी लागते. या कारणास्तव या मर्यादेची अमर्यादा न होण्याविषयीं आम्ही पूर्ण खबरदारी घेतली आहे. या पुस्तकांतील कांहीं विडंबित गृहस्थ रा. अत्रे यांचे स्नेही आहेत व त्यांना रा. अत्रे यांचें काव्य वाचून आनंद व कौतुक वाटलें असें समजतें. हें खरें असेल तर रा. अत्रे यांचा हा प्रयत्न यशस्वी झाला हें उघड आहे. आम्ही रा. अत्रे यांच्या अत्यंत निकटवर्ती सुहृदांच्या कोटींतले नाहीं. इतकेंच नव्हे, तर विरोधभक्तीनें त्यांनीं आम्हांसही प्रस्तुत पुस्तकांतच थोडासा विडंबनप्रसाद दिलेला आहे! परंतु रा. अत्रे यांनीं या पुस्तकाच्या शेवटीं 'रसिकांची चेतवणी' या पद्यांत सुचविल्याप्रमाणें झेंडूच्या 'तळिचें खोबरें' आम्हीं घेतलें व तें आम्हांस रुचकर व स्वादिष्ट लागलें, म्हणूनच आम्हांस त्यांच्या दोषदर्शनकलेचें कौतुक करावेंसें वाटतें. आमच्यासारख्या विडंबित व्यक्तीनें या पुस्तकाला लिहिलेला हा प्रस्ताव त्याच्या चांगुलपणाचा प्रबल पुरावा नव्हे काय? असो. शेवटीं या चिमुकल्या, चुरचुरीत, चटकदार, चमत्कृतिपूर्ण, चारुतासंपन्न व चातुर्यमंडित ललित-पुस्तकाचें पुन्हा एकवार मनःपूर्वक अभिनंदन करून आम्हीं श्रीयुत अत्रे यांची रजा घेतों.

सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें.<br>
श्रावण शुद्ध १५, शके १८५२

लक्ष्मणशास्त्री लेले

## २. साहित्याचार्य तात्यासाहेब कोल्हटकर यांचें एक खाजगी पत्र

जळगांव, वऱ्हाड
ता. १-१२-२५

कृतानेक साष्टांग नमस्कार, विनंती विशेष—

आपलें ता. २५-११-२५ चें पत्र व 'झेंडूचीं फुलें' हें पुस्तक हीं दोन्ही मला ता. २९-११-२५ रोजीं मिळालीं. पत्ता खामगांवचा दिल्यामुळें मिळण्यास दोन दिवस उशीर लागला. मी सन १९१८ सालापासून खामगांव येथें नसून जळगांव येथें वकिली करीत आहें. हें जळगांव वऱ्हाडांतील असून खानदेशांतील जळगांवाहून अर्थातच भिन्न आहे.

आपण प्रेमानें भेटीदाखल पाठविलेल्या पुस्तकाचा मी प्रेमानें व कृतज्ञतापूर्वक स्वीकार करितों. गेल्या कांहीं महिन्यांपासून मला कांहीं कारणामुळें प्रसिद्धीकरितां अभिप्राय पाठविण्याचें बंद करावें लागलें आहे. शिवाय वयोमानास अनुसरून माझ्या अंगची शक्ति व उत्साह मंदावून माझ्यामागील व्याप मात्र झपाट्यानें वाढत गेल्यामुळें नेहमींचा पत्रव्यवहार सांभाळण्यापलिकडे कोणतेंही महत्त्वाचें काम करण्यास मला सवड राहीनाशी झाली आहे. तथापि आपल्यासारख्या बुद्धिमान् व रसिक कवीच्या पहिल्याच इच्छेचा मजकडून अनादर होऊं नये म्हणून मी आपल्या पुस्तकावरील अभिप्राय केवळ आपल्या स्वतःच्याच माहितीसाठीं पाठवीत आहें. कृपा करून ह्या अभिप्रायाची वाच्यता करूं नये.

या विडंबनकाव्यांत आपण ज्या कवींच्या कवितांची थट्टा केली आहे त्यांपैकीं बहुतेक माझ्या परिचयाचे असून त्यांतील अनेक माझे स्नेही आहेत. त्यांतील कित्येकांच्या कवित्वशक्तीबद्दल मला आदर वाटतो व कवितांबद्दल प्रेम वाटतें. असें असतांही मी प्रस्तुत पुस्तकांतील विनोदाचा आस्वाद उत्तम प्रकारें घेऊं शकलों याचें कारण त्या विनोदाचा अस्सलपणाच होय. वृत्तपत्रांतून प्रथम या काव्यांतील पंक्ति माझ्या अवलोकनांत आल्या, तेव्हांच या काव्यांचा कर्ता अत्यंत बुद्धिमान् असला पाहिजे असें मी अनुमान काढिलें. तें खरें ठरलें आहे हें पाहून समाधान वाटतें.

काव्यदोष दाखविणारा टीकाकार स्वतः निर्दोष काव्य लिहिणारा कवि असला तर दुधांत साखर पडते. प्रस्तुत काव्याच्याद्वारा कवींच्या दोषांची थट्टा करण्याचा हेतु असला तरी थट्टा करितां करितांही कवितेची रचना सरस झाली आहे, हें

"'सखे बोल बोल', 'रस्त्यावर पडलेलें बिडीचें थोट्क' या मथळ्याखालीं आलेल्या दोन कविता व 'नवरसमंजिरी' या कवितांवरून स्पष्ट होतें. सुंदर मनुष्यानें दुसऱ्यास वेडावण्याकरितां स्वतःचें मुख कितीही विकृत केलें तरी तें सुंदरच दिसतें.

सर्व कवितांत मला 'मोहरममधली मर्दुमकी', 'कषाय-पेय-पात्र-पतित-मक्षिके-प्रत' व 'श्यामले' या कविता उत्तम वाटल्या. ज्या कवींचा उपहास करण्याचा त्या कवितांच्या द्वारें प्रयत्न केला आहे, त्या कवींची त्यांवरून पूर्ण ओळख पटते. पहिल्या कवितेंत 'मंगल' या शब्दानंतर 'कोइबी बात वदण्याचा' वगैरे पंक्ति आणि 'आनंद' या शब्दापुढें 'और' व 'क्या कहूं मै तुमकू यार' या ओळी घातल्यामुळें संस्कृत व परदेशी शब्दांचे गंगाजम्नी संगम घडविण्याचा जो प्रकार हल्लीं दिसून येतो, त्याची योग्य संभावना झाली आहे. 'रेवड्या पाडण्या बसला' 'रविवारीं हकनाक बुडाली सुट्टी...खुदाची सारी' येथें क्षुल्लक गोष्टीस महत्त्व देण्यापासून होणारा रसभंग प्रत्ययास आणिला आहे; व 'ते स्वार्थत्यागी वीर... नामर्द देश हा बनला' येथें कृत्रिम आवेशाची थट्टा केली आहे. 'मक्षिके' वरील कवितेंत आरंभींच लांबलचक संस्कृत शब्दांच्या समासाच्या मागाहून 'क्या हुवा अफसोस' असा उर्दू शब्द आल्यामुळें उपर्युक्त गंगाजम्नी संगमाचा दोष फारच खुलून दिसतो. या कवितेंत माशीसारख्या क्षुद्र प्राण्याचा रा. रा. द. ह. भट, पर्जन्यकाळ, वसंत, कविमुखें, कौन्सिलें, राष्ट्रभक्त इत्यादिकाशीं 'माशा मारणें' 'माशी शिंकणें' इत्यादि सांप्रदायाच्या मध्यस्थीनें किंवा अन्यथा जो बादरायण संबंध ओढून ताणून जोडला आहे तो बहारीचा आहे. या कवितेंत क्षुद्र वस्तूस महत्त्व देण्यापासून होणाऱ्या बेरंगाची कांहीं फार हास्यापद उदाहरणें आहेत. 'श्यामले' या कवितेंत स्वदेशी व परदेशी शब्दांची व कल्पनांची खिचडी फार खमंग झाली आहे. बहुतेक कवितांचें अंग चांगले साधलें आहेत. विशेषेंकरून 'सखे बोल बोल', 'रस्त्यावर पडलेलें बिडीचें थोट्क', 'कषाय-पेय-पात्र-पतित-मक्षिकेप्रत', 'वीररस' 'बीभत्सरस', या कवितांचे शेवट फार बहारीचे आहेत.

याशिवाय कांहीं विशेष सुंदर पंक्ति खालीं देत आहोंत.

'द्रोणागिरीसह जसा हनुमंत .........उचलून तेवी'
'फेकुं सालटीं ..................जातिल वाळुनी'
'अरबी समुद्रहि मी जरी .........रसनिर्झरी'
'हैदोस कर्कश मी जरी ......अल्लाहु अक्बर तूं तरी'

'स्मरते मला ......... मनोहर पर्करी'
'निर्दोष तो देशिल का पापा छुपा .........'
'डोळ्यांत आंसवें आलीं परि रुमाल .........'
'चिवड्याचें गाणें गरम ................ नरम'
'शिव्या द्यायाही ......... तयाचे'
'दोन महिने ...... दुष्ट दिवस आले'
'करी तत्त्वाचा त्याग ...... जगीं जेठी'
'दोन आत्म्यांचा ......... भीष्मांत अतां आला'
'पद्याला विसरून ......... गुद्द्यावर'
'बुद्धीचे अरबी समुद्र ......... आटुनी'
'जेव्हां बेचव ......... भुंकेल कोणी न कीं?'

याशिवाय पुस्तकाचें नांव, अर्पणपत्रिका हे भागही ठीक आहेत. चेंडूवर 'झेंडू' असा बदल करून आपण जी मौज पुस्तकारंभीं ब्रीदवाक्य म्हणून दिली आहे, ती पुस्तकाच्या स्वरूपास शोभण्यासारखीच आहे.

आपण ज्या कवींवर शस्त्र उपसलें आहे ते सर्वच सारख्या योग्यतेचे नाहींत हें आपणही कबूल कराल. माझ्या मतें त्यांपैकीं कांहीं जणांची कवित्वशक्ति श्रेष्ठ दर्जाची आहे व आपण दाखविलेले दोष नाहींसे झाल्यास त्यांची कविता बऱ्याच उच्च प्रतीची ठरेल. आपल्या विडंबनकाव्याचा केवळ त्यांच्या दोषांवरच परिणाम होऊन गुण कायम राहिले तर मला फारच आनंद होईल; परंतु चांगले कवि मनाचे अत्यंत कोमल असतात व आपल्या उपहासाचा त्यांच्या कवित्व-शक्तीवर अनिष्ट परिणाम झाला तर मराठी कवितेच्या इतर अभिमान्याप्रमाणें मलाही वाईट वाटेल. तथापि परिणामनिरपेक्ष दृष्टीनें विचार केला तर आपलें काव्य उत्तम झालें आहे असेंच कबूल करणें भाग आहे व त्याबद्दल मी आपलें मनःपूर्वक अभिनंदन करितों.

हल्लीं थंडीमुळें माझ्या बोटांत भेगा पडल्या असून लिहितांना फार त्रास होतो. यामुळें हें पत्र पाठविण्यास दोन दिवसांचा उशीर होत आहे याबद्दल राग नसावा. क. लो. अ. हे वि.

आपला,
**श्री. कृ. कोल्हटकर**

## ३. मी विडंबनकार कसा झालों ?

**विनोदी** लेखक म्हणून महाराष्ट्रांत माझें नांव होईल अशी मला पूर्वी कल्पना-देखील नव्हती. त्या दृष्टीनें मी कधीं तयारीही पण केली नव्हती. विनोद मला पहिल्यापासून आवडायचा हें खरें. पण विनोदी लेखन आपल्याला साधेल असें मला कधींही वाटलें नाहीं. 'झेंडूच्या फुलां'नीं महाराष्ट्रांत माझ्या विनोदाचा पहिल्यानें गवगवा केला. पण 'झेंडूचीं फुलें' तरी मी लिहीन असें मला पूर्वी वाटलें होतें म्हणतां का ? मुळींच नाहीं. विडंबनकाव्य म्हणजे काय तें मला नुसतें ऐकूनच माहीत होतें. त्या वाङ्मयप्रकाराचा मी अभ्यासही केला नव्हता. करण्याची कधीं जरुरीच पडली नव्हती. असें असतां विडंबनकाव्यें लिहिणारा विनोदी कवि म्हणून अकस्मात् एके दिवशीं मला प्रसिद्धी मिळाली. घरांत अंथरुणावर झोपलेला माणूस झोपेमध्येंच उठावा आणि वळकटी गुंडाळून रस्त्यावर येऊन बसावा तसें माझें झालें. प्रेमाचीं आणि निसर्गाचीं हळुवार गाणीं स्वतःशींच गुणगुणणारा माझ्यासारखा एक लाजरा माणूस एके दिवशीं आपली चालचलणूक आणि चर्या बदलून खुशाल विडंबनकाव्याच्या खुंटावर येऊन बसलेला होता आणि लोक त्याच्याभोंवती टाळ्या पिटून आणि मोठमोठ्यानें हंसून गर्दी करून राहिले होते. मी डोळे किलकिले करून अधून मधून त्या मंडळीकडे पहात होतों आणि मनांतल्या मनांत अचंबा करीत होतों कीं हें सारें झालें कसें आणि मी येथें आलों कसा ! वास्तविक, मला जायचें होतें दुसऱ्याच मुक्कामाला. मला 'बालकवि' व्हायचें होतें. मला 'गोविंदाग्रज' व्हायचें होतें. त्यासाठीं माझी खटपट चालू होती. पण तें सगळें राहिलें बाजूला आणि 'देवा'च्या आळंदीला पोहोंचायच्याऐवजीं मी 'चोरा'च्या आळंदीला जाऊन पोहोंचलों ! बाकी माझ्या सर्वच आयुष्याचें तसें झालें आहे म्हणा. मला जें व्हायचें होतें तें कधींच होतां आलें नाहीं. आणि करायचें होतें तें कधींच करतां आलें नाहीं. प्रत्येक वेळेला कांहीं तरी अपघात होऊन निराळ्याच वाटेनें जाणें मला भाग पडे. आणि त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, आयुष्यांत आज मी भलत्याच ठिकाणीं येऊन बसलों आहें. आणि त्याचमुळें पुष्कळांचा माझ्याविषयीं गैरसमज झालेला आहे—हो, पण मला सांगायचें होतें तें निराळेंच. 'झेंडूच्या फुलां'बद्दल मी बोलत होतों नव्हे का ?

**मला** आठवतें तेव्हांपासून मी लिहितों आहें अन् कविता करतों आहें. अकरा सालीं माझी बालकवि ठोमरे ह्यांच्याशीं ओळख झाली. ओळख झाली

म्हणजे मी त्यांना ओळखूं लागलों. त्यांचा धाकटा भाऊ माझ्या वर्गांत होता. एकदोन वेळां मी त्यांच्या घरीं गेलों. आणि माझ्या काव्यलेखनाचे मी त्यांना गुरु केले. चौदा सालीं गडकऱ्यांचा नि माझा परिचय झाला. त्यांचाही धाकटा भाऊ माझ्याच वर्गांत होता. गडकऱ्यांच्या कविता मला अतिशय आवडत. बहुतेक साऱ्या मला जवळजवळ तोंडपाठच होत्या म्हणानात. पण गडकऱ्यांच्या कवितेचा माझ्या काव्यावर परिणाम झाला नाहीं. माझें वळण बालकवींचेंच राहिलें. बालकवींच्या काव्याची जादूच मुळीं अशी कांहीं विलक्षण होती कीं त्याचें अनुकरण करण्याचा मोह गडकऱ्यांनादेखील टाळतां आला नाहीं. मग माझी कथा काय? वाङ्मयीन आयुष्याच्या अगदीं प्रारंभालाच गडकऱ्यांशीं नि बालकवींशीं माझा निकट संबंध आला. त्याचा एक परिणाम असा झाला कीं, वाङ्मयाच्या शुद्ध आणि अभिजात परंपरांची मला गोडी लागली. आणि त्या बाबतींतली माझी अभिरुचि अतिशय खाष्ट आणि चोखंदळ बनली. ज्याला उत्तम लेखक व्हावयाचें आहे त्याचें नाक आणि जीभ भारी तिखट असायला पाहिजे. कुठें काय बिघडलें याचा त्याला चटकन् वास आला पाहिजे. आणि मालमसाला कुठें कमी पडला आणि कुठें जास्त झाला हें ताबडतोब त्याच्या चवीला समजलें पाहिजे. आजच्या काळांत दोन आण्याची भाताची ताटली जेवण्याची लोकांना संवय लागल्यामुळें कोणतें कदान्न आणि कोणतें पक्वान्न हें त्यांना मुळीं कळेनासेंच झालें आहे. कशांतच कोणाला कांहीं चव राहिली नाहीं. 'वाङ्मयीन अभिरुचि' या शब्दाला आज फारसा अर्थ राहिला नाहीं. म्हणूनच विडंबनाचें महत्त्व काय आहे आणि वाङ्मयांत त्याची आवश्यकता कां निर्माण होते हें सामान्य वाचकांना समजावून सांगणें कठीण आहे. ज्या काळांत मी कविता लिहूं लागलों तो 'नवीन कविते'च्या वैभवाचा काळ होता. केशवसुतांच्या 'तुतारी'च्या ललकाऱ्या त्या वेळीं वातावरणामध्यें एकसारख्या उचंबळत होत्या. बालकवींच्या प्रतिभेचा 'अरुण' महाराष्ट्राच्या क्षितिजावर नुकताच उगवलेला होता. 'पंचप्राणाचा पंचम' लावून गोविंदाग्रज कोकिळाच्या उन्मादाने प्रेमाची रागदारी आळवीत होते. 'बी' कवींच्या चौघड्यानें नि तांबे कवींच्या सनईनें शारदेच्या मंदिरांत माधुर्याबरोबर एक प्रकारचें मांगल्यही निर्माण झालें होतें. नवकवितेची एक विलक्षण धुंदी आमच्या डोळ्यावर त्या वेळीं चढली होती. डोक्यामध्यें एक प्रकारची मस्ती भरून राहिली होती. या धुंदीमधून आम्हांला वीसएकवीस सालीं पुण्याच्या 'रविकिरण मंडळा'नें जागें केलें. नुसतें जागें केलें नाहीं तर गार पाण्याची बादली घेऊन ती आमच्या डोक्यावर त्या मंडळानें अक्षरशः भडाभडा ओतली. त्याचा परिणाम दुसऱ्या कोणावर काय झाला,

मी कांहीं सांगूं शकत नाहीं. पण माझ्या स्वतःवर तरी असा झाला कीं, भावकाव्याचें गंभीर अवगुंठन झुगारून देऊन माझ्यामधला व्रात्य विडंबनकार डुरकाळी फोडून एकदम बाहेर पडला. माणसावर आकस्मिक आपत्ति आली म्हणजे एका रात्रींत त्याचे काळे केस जसे पांढरे होतात तसें माझें झालें. माझ्या प्रतिभेला आलेली 'दुपारीचीं फुलें' एकदम गळून पडलीं. आणि तिच्यावर सरासरा 'झेंडूचीं फुलें' फुलून आलीं. 'रविकिरण मंडळ' जर प्रकट झालें नसतें तर माझ्या बुद्धीच्या खोल कपारीआडून विनोदाचा चांगला मनगटाएवढा झरा वाहतो आहे याचा मला मुळींच सुगावा लागला नसता, हें अगदीं खरें आहे! 'रविकिरण मंडळा'नें इतर पुष्कळ कामगिरी केलेली असेल! त्याच्याशीं मला या ठिकाणीं कर्तव्य नाहीं. पण मला त्यानें विडंबनकार बनविलें ही माझ्या-दृष्टीनें विशेष महत्त्वाची गोष्ट आहे.

**अठरा** एकोणीस सालीं बालकवि आणि गडकरी वारले. त्यामुळें मराठी कविता एकदम मंदावल्यासारखी झाली. म्हणजे जवळ जवळ तिची ज्योत अगदीं मालवण्याच्या बेतांत आली. शारदेच्या अंगणांत काळोख पसरला. बारीक सारीक कवि आपापल्या घरचीं दारें बंद करून आणि डोक्यावर दुलया ओढून गप्प बसले. बाहेरच्या काळोखांत एकट्यादुकट्या कवीला फिरण्याची जणुं कांहीं प्राज्ञाच नव्हती. अशा वेळीं पुण्यांतले सातआठ कवि एकमेकांचा हात धरून भीत भीत एका ठिकाणीं जमले आणि त्यांनीं एका कोपऱ्यांत एक लहानशी शेकोटी पेटविली. तिचें नांव 'रविकिरणमंडळ.' ही मंडळी दर रविवारीं एकत्र जमत. आणि लिहिलेल्या कविता चहा पितां पितां ते एकमेकांना वाचून दाखवत आणि त्यावर चर्चा करीत. कवींचीं मंडळें त्या पूर्वी महाराष्ट्रांत स्थापन झालीं नव्हतीं असें नव्हे. 'पण 'रविकिरणमंडळाचें' स्वरूप अभिनव होतें. काव्य-निर्मितीसाठीं स्थापन झालेली ती एक प्रकारची सहकारी पेढीच होती म्हणानात. या मंडळींतले कांहीं कवि व्यक्तिशः त्या वेळीं महाराष्ट्रांत थोड्या फार प्रमाणानें माहीत होते. नाहीं असें नाहीं. पण त्यांना विशेष प्रसिद्धी अशी मिळाली नव्हती. त्यांच्या काव्यानें तोंपर्यंत तसें कांहीं वैशिष्ट्य प्रकट केलें नव्हतें. पण 'रविकिरण मंडळां'त ही मंडळी सामील झाल्यापासून त्यांच्या पूर्वीच्या स्वरूपांत एकदम फरक पडला. आणि त्यांच्यापैकीं कांहींची चेहेरेपट्टी तर अजिबात बदलून गेली. ही किमया त्यामधल्या केवळ एकाच माणसानें केली. त्याचें नांव प्रा. माधवराव पटवर्धन किंवा माधव जूलिअन्. हेच 'रविकिरणमंडळीं'तले खरे 'रवि' होते. बाकीचीं निदान त्या वेळीं तरी किरणें होतीं. माधव जूलिअन् हे फर्ग्यूसन कॉलेजांत फार्शी भाषेचे प्राध्यापक म्हणून नुकतेच त्या वेळीं नेमण्यांत

आलेले होते. फार्शी कवितेचा आणि फार्शी भाषेचा त्यांच्यावर त्या वेळीं विलक्षण पगडा बसलेला होता. यामुळें कवितेच्या प्रांतांत सामान्यपणें वावरणाऱ्या माण-सापेक्षां त्यांच्यामध्यें एक वेगळेंच व्यक्तिमत्त्व तयार झालें होतें. त्यांच्या विचारांत आणि भाषेंत अनेक चमत्कारिक खोडी भरलेल्या होत्या. त्यांचा परिणाम 'रवि-किरणमंडळा'च्या सभासदांवर इतका झाला कीं त्यांपैकीं पुष्कळसे माधव जूलियन्च्या दृष्टिकोणानें काव्याकडे पाहूं लागले आणि जवळ जवळ त्यांच्याच वृत्तांत नि भाषेंत कविता लिहूं लागले. केशवसुतांच्या अनुयायांनीं निर्माण केलेल्या नवकवितेच्या बाळबोध परंपरांशीं माधव जूलियन्नीं सुरू केलेला 'रवि-किरणमंडळा'चा फार्शी फॅशन पंथ अतिशय विसंगत होता. गणपतीची आरति चालू असतांना त्याच ठिकाणीं 'गॉड सेव्ह द किंग' हें गाणें एकाग्रानें सुरू करावें म्हणजे भाविक मनाला कसें वाटेल? तसें मला वाटलें. विडंबनकाव्य ही त्याच माझ्या दुखावलेल्या भावनेची वाङ्मयीन प्रतिक्रिया होती.

**माधव** जूलिअन् यांच्या समग्र काव्यावर मी कांहीं या ठिकाणीं अभिप्राय देत नाहीं. किंवा त्यांच्या वाङ्मयांत अभिजातपणा नव्हता असेंही पण मी येथें सुचवीत नाहीं. माधव जूलिअन् यांच्या काव्याचा आत्मा आणि पिंड पुढें इतका बदलत गेला कीं अखेर आरशांत त्यांना आपला चेहरा ओळखतां आला असता कीं नाहीं याची शंका आहे. डोक्यावरची साहेबी टोपी जाऊन त्या ठिकाणीं पुणेरी लाल पगडी येईपर्यंत त्यांच्या जीवनांत आणि वाङ्मयांत उलथापालथ झाली. म्हणून प्रामाणिक टीकाकारांना त्यांच्यावर सरसहा टीका करणें कठीण आहे. कारण कांहीं ठिकाणीं त्यांच्या लिखाणाचे वाभाडे काढावेसे वाटतात; तर कांहीं स्थळीं त्यांचें वाङ्मय डोक्यावर घेऊन नाचावेसें वाटतें. त्यांच्या प्रतिभेचा गेंद त्यांच्या आयुष्याच्या उत्तरार्धांत उत्फुल्ल झाला हें जरी खरें असलें; तरी त्यांच्या कवितेचें प्रारंभीचें स्वरूप इतकें बेंगरूळ आणि घेडगुजरी होतें कीं तें बघून आमच्यासारख्या शब्दसंगीताच्या आणि ध्वनिसौंदर्याच्या उपासकांना विलक्षण हादरा बसला. माधव जूलिअन् यांची वृत्ति आणि प्रतिभा बंडखोराची होती यांत मुळींच संशय नाहीं. पण केशवसुतांना ज्या अर्थानें बंडखोर कवि म्हणतां येईल, त्या अर्थानें माधव जूलिअन् ह्यांना कांहीं बंडखोर म्हणतां यावयाचें नाहीं. केशवसुतांचें बंड हें वैचारिक बंड होतें. खरें बंड होतें तें. माधव जूलिअनांचें बंड हें निव्वळ भाषेपुरतें होतें. लहानपणीं आमच्या वर्गांत एक मुलगा होता. तो एके दिवशी आपल्या भुवया भादरून वर्गांत आला. त्याबरोबर मुलांमध्यें मोठा हंशा पिकला. शिक्षकानें विचारलें, "कां रे, हें काय भलतेंच करून आलास?" तो मुलगा म्हणाला, "मग? भुवया राखल्याच पाहिजेत

असें कोणी सांगितलें आहे. ! सगळे ज्या अर्थी त्या राखतात त्या अर्थी मी त्या काढून टाकायचें ठरविलें आहे." माधव जूलिअन्‌चें बंड जवळ जवळ अशाच प्रकारचें होतें. त्यांत विक्षिप्तपणाचा भाग विशेष होता. काव्याचें स्वरूप अशा तऱ्हेचें पाहिजे असें तुम्ही म्हणतां ना? कवितेमध्यें अमुक एक शब्द येतां कामा नये असा तुमचा आग्रह आहे ना? मग हें तुमचें म्हणणें मी नाहीं ऐकणार! हा तुमचा आग्रह मी नाहीं मानणार! ही माधव जूलिअन्‌ यांची वृत्ति होती. वास्तविक, अर्थाच्या आणि रसाच्या दृष्टीनें त्यांची कविता कांहीं तितकीशी वाईट नव्हती. पण तिच्या विक्षिप्त शब्दभूषेमुळें आणि तऱ्हेवाईक छपाईमुळें ती विशेष-हास्यास्पद वाटत होती. 'वन्दे त्वमेकम्‌ अल्लाहु अक्बर' हा डोक्यावर पगडी आणि कमरेला लुंगी नेसलेल्या त्यांच्या त्यावेळच्या काव्याचा एकच विक्षिप्त नमुना माझ्या म्हणण्याची सत्यता पटवून द्यावयास पुरेसा आहे.

पुरोगामी वृत्तीचा असला म्हणजे त्याचा छांदिष्टपणा आणि तऱ्हेवाईकपणा क्षम्य ठरतो. केशवसुतांची भाषा आणि रचना कित्येक ठिकाणीं काय कमी बेडौल आहे? तथापि, त्यांच्या विचारांत एवढी क्रांति भरलेली आहे कीं तिच्या तेजामुळें डोळेच दिपतात. अन्‌ मग त्यांच्या रचनेंतल्या दोषाकडे बघण्याचें कोणाला स्मरणही रहात नाहीं. माधवरावांचें तसें नव्हतें. त्यांच्या काव्यांत क्रांतिकारक असें कांहींही नव्हतें. कारण वैयक्तिक जीवनांत ते अतिशय प्रतिगामी होते. राष्ट्रीय चळवळीचे ते विरोधक होते. लोकमान्य टिळकांना सबंध पुणें शहरातर्फे जाहीर मानपत्र देण्यासाठीं मंडईंत जी विराट सभा भरली होती, त्या सभेंत टिळकांच्या मानपत्राला विरोध करण्यासाठीं ते उभे राहिले होते. दैवानें खैर केली म्हणूनच त्या वेळीं ते बचावले. नाहींतर खवळलेल्या जनसमूहानें त्यांची काय दशा करून टाकली असती त्याची कल्पनाही करवत नाहीं. सामाजिक विचारांतही ते बोलके सुधारक होते. आचारांनी ते सनातनीच होते. प्रेमविवाह करण्याची सुंदर संधि त्यांच्यापुढें चालून आली असतां ती त्यांनीं वेंधळेपणानें दवडली व स्वतःच्या चारित्र्याला विनाकारण ठपका लावून घेतला. राजकारणांत तर पुढें पुढें एकाद्या कडव्या हिंदुत्वनिष्ठापेक्षांही ते मुसलमानांचे कट्टर द्वेष्टे बनले. वास्तविक माधवरावांच्या काव्यासंबंधीं बोलतांना या साऱ्या गोष्टी सांगण्याची जरूरी नाहीं. तथापि, त्या सांगितल्यावांचून माधवरावांच्या प्रतिगामी स्वरूपाच्या वाङ्मयीन विक्षिप्तपणाची कल्पना वाचणाराला यावयाची नाहीं, म्हणून त्या एवढ्या विस्तारानें सांगितल्या. माधव जूलिअन्‌चें काव्य प्रथम प्रसिद्ध झालें त्या गोष्टीस आतां जवळ जवळ तीस वर्षें होत आलीं. त्या वेळीं माधवरावांच्या ज्या लकबी आणि तऱ्हा आम्हांला हास्यास्पद वाटत होत्या, त्या माधवरावांचें अनुकरण

करणाऱ्या अलिकडच्या कविमंडळींनी मराठी भाषेंत इतक्या रूढ करून टाकलेल्या आहेत कीं आतां त्यांचें एवढें हंसूं येत नाहीं. 'उन्हाळे पावसाळे अन् हिवाळे लोटले भगवन्' किंवा 'किती मैल अंतर राहिलें आपुल्यांत सद्गुणसुंदरी' या ओळी आतां वाचल्या म्हणजे त्यामध्यें कुठें कांहीं तरी खटकते आहे असें वाचकांना वाटणें कठीण आहे. म्हणून माधव जूलिअन् किंवा त्यांचे सहकारी कवी ह्यांच्या काव्यामधले दोष कोणते आणि त्यांचें विडंबन मी कसें केलें हें ज्याला समजून घ्यावयाचें असेल, त्याला त्या काळांतल्या रूढ वाङ्मयीन परंपरांचा फार मार्मिकपणें अभ्यास करावा लागेल.

माझ्या विडंबनकाव्यांची मौज अशी कीं तीं बसल्या बसल्या आणि बोलतां बोलतां सहज गमती गंमतीनें तयार झालीं. तीं लिहिण्यांत केवळ स्फूर्तीचाच भाग होता. प्रयत्नाचा भाग मुळींच नव्हता असें म्हटलें तरी चालेल. तो बावीस सालचा मे महिना होता. शाळेला सुट्टी होती. आम्ही चारपांच शिक्षकमित्र एके ठिकाणीं जमत असूं आणि जवळ जवळ सबंध दिवस चकाट्या पिटण्यांत घालवीत असूं. चहा प्यायचा, विड्या ओढायच्या अन् तोंडाला येईल तें बोलायचें, हा आमचा त्या वेळचा कार्यक्रम होता. आमचें तें टोळकें 'पठाण क्लब' या नांवानें संबोधलें जात असे. 'रविकिरणमंडळा'च्या कवितांचा एक चिमुकला संग्रह त्याच सुमारास प्रसिद्ध झाला. आणि त्याची एक प्रत आमच्या मंडळांत कोणी तरी आणली. झालं न् काय. पुढें सातआठ दिवस त्या संग्रहा-खेरीज आमच्या तोंडांत दुसरी भाषा नव्हती. त्यामधल्या कोणत्याही कवितेच्या अंगावरची साल आम्ही कांहीं शिल्लक ठेवली नाहीं. आमची पद्धत अशी असे. कोणीतरी एकादी कविता घ्यायची आणि तिच्यांतले दोष उघडकीस येतील अशा अतिशयोक्त स्वरानें आणि अंगविक्षेपानें ती मोठ्यानें वाचून दाखवायची. आणि बाकीच्यांनीं मोठमोठ्यानें हंसून त्यांतून उद्भवणाऱ्या विनोदाचा आस्वाद घ्याव-याचा. 'रविकिरण मंडळा'च्या तऱ्हेवाईक काव्यांचें केवळ वाचनामध्यें आम्ही जें हें पद्धतशीर विडंबन चालविलें होतें त्याचा परिणाम माझ्यावर तरी असा झाला कीं, एके दिवशीं मला स्फूर्तीचा जबरदस्त झटकाच आला अन् मी विडंबनकाव्याच्या ओळीच्या ओळी एका मागून एक बडबडूं लागलों. त्यामुळें आमच्या मंडळांत हास्यरसाला असा महापूर आला म्हणतां! माझ्या मित्रांना भ्रम पडला. त्यांना कळेना कीं हें माझें काव्य आहे, का रविकिरणमंडळांतल्या एखाद्या कवीचें काव्य आहे! त्या वेळीं मला प्रथम जाणीव झाली कीं, कांहीं तरी एक निराळी वल्ली आपल्या हातांत लाभली आहे. आणि ही आतां आपण गमावतां कामा नये. या मानसिक अवस्थेंतून 'झेंडूच्या फुलां'चा जन्म झाला. त्यामधल्या बहुतेक

कविता सातआठ दिवसांच्या काळामध्यें मी भराभर लिहून टाकल्या. कवितेमधल्या शाब्दिक दोषांचेंच केवळ मी बिडंबन केलें नाहीं, तर कवितेसाठीं निवडलेल्या विषयाची आणि काव्यांत ठिकठिकाणीं प्रकट झालेल्या कवींच्या स्वभावाचीही मी माझ्या बिडंबनामध्यें दखलगिरी घेतली. मीं त्या वेळीं लिहिलेलीं सगळींच काव्यें विडंबनात्मक नव्हतीं. कांहीं विनोदी कविताही त्या ओघांत मी लिहून टाकल्या. त्यापूर्वीं आधीं दोनतीन वर्षें माझें कवितालेखन अजिबात थांबल्यासारखे झालें होतें. तें अशा आकस्मिक रीतीनें अगदीं निराळ्याच स्वरूपांत पुन्हां सुरू झालें.

बावीसच्या मे महिन्यांत मी 'झेंडूचीं फुलें' लिहिलीं खरीं, पण त्यांचें हस्तलिखित जवळजवळ चार वर्षें माझ्याजवळ तसेंच पडून होतें. त्यामधल्या कविता प्रसिद्ध करण्याचें किंवा त्या कोणाला वाचून दाखविण्याचें धैर्यच मला होईना. रिकामपणाच्या वेळीं केलेला कांहीं तरी एक व्रात्यपणा या पलिकडे त्याचें मला महत्त्व वाटेना. पांचदहा मित्रांपलिकडे त्याची कोणाला विशेष माहिती नव्हती. अधिक प्रमाणावर त्याची वाच्यता करण्यानें आपल्याला नांव मिळावयाच्या ऐवजीं जें कांहीं पूर्वीं मिळालेलें आहे तें जायचें अशी मला भीति वाटत होती. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या अध्यक्षतेखालीं पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळामध्यें जें शारदोपासक संमेलन भरलें होतें, त्यामध्यें एका संध्याकाळीं 'झेंडूच्या फुलां'चें जाहीर वाचन करण्याचा पहिल्यानें योग आला. आम्ही पांचपन्नास मंडळी अशी सतरंजीवर लोळत पडलों होतों. कांहींही उद्योग नव्हता आम्हाला. उगाच कांहींतरी थट्टामस्करी चालली होती. इतक्यांत कोणी कोणाच्या कानांत कांहींतरी कुजबुजलें. आणि या बैठकींत 'झेंडूच्या फुलां'चें वाचन झालें पाहिजे अशी चहूंकडून एकच आरोळी उठली. असें कांहींतरी होणार अशी मला थोडीशी कल्पना होती. म्हणून हस्तलिखित खिशांत घालून मी आलोंच होतों. भीत भीत मी टेबलाजवळ गेलों आणि हलक्या आवाजांत कवितावाचनास सुरुवात केली. ऐकणाऱ्यांची पहिली प्रतिक्रिया काय होईल याची मला मुळींच कल्पना नव्हती. पहिल्या दोन ओळी वाचल्या नाहींत तोंच बैठकीतलें वातावरण एकदम बदललें. ही कांहीं तरी नवीन भानगड आहे असें प्रत्येकाला वाटलें. आरंभीं श्रोते बेताबेतानें हंसत होते. पण पहिली कविता वाचून होतांच सारे मुक्तकंठानें हंसूं लागले. आणखी दोन कविता वाचून होतांच सर्वांच्या हंसतां हंसतां मुरकुंड्या वळल्या. 'रविकिरणमंडळा'च्या कविता त्यांपैकीं बहुतेकांच्या उत्तम परिचयाच्या होत्या. त्या मंडळाच्या कवींच्या काव्यांत गुण काय आहेत आणि दोष काय आहेत, याची त्यांना चांगलीच कल्पना होती.

म्हणूनच आपल्या मनांतली टीका असें विनोदी स्वरूप धारण करून काव्यरूपानें प्रकट झालेली पाहून त्या मंडळींना मनस्वी मौज वाटली. त्यांनीं सर्वांनीं माझी पाठ थोपटली. आणि आजपर्यंत हें 'रसायन' गुप्त ठेवून दिल्याबद्दल मला दोष दिला. त्यानंतर दोन महिन्यांनीं 'झेंडूच्या फुलां'ची पहिली आवृत्ति मी प्रसिद्ध केली. ती पांचसहा महिन्यांच्या आंतच फस्त झाली. 'झेंडूच्या फुलां'च्या लोकप्रियतेचें एक वैशिष्टय असें होतें कीं, वाङ्मयाशीं ज्यांचा सुतराम् संबंध नाहीं अशा वाचकांना तीं अतिशय आवडलीं. माझ्या माहितीचे पुण्यामधले एक सुप्रसिद्ध वकील आहेत. त्यांनीं आयुष्यांत 'झेंडूचीं फुलें' हें एकच मराठी कवितेचें पुस्तक वाचलेलें आहे. त्यावरून एक गोष्ट माझ्या लक्षांत आली कीं विडंबनाचा भाग वजा करूनहि 'झेंडूच्या फुलां' मधल्या कवितेंत स्वतंत्र विनोदाचा भाग पुष्कळच आहे. आणि त्यामुळेंच इतकीं वर्षें होऊन गेलीं असतांही 'झेंडूच्या फुलां'च्या लोकप्रियतेला अद्यापि खळ पडलेला नाहीं.

ज्यांच्या काव्यांचें मी विडंबन केलें ते 'रविकिरणमंडळा'मधले कवि माझे मित्र होते. त्यांपैकीं कित्येकांचे तर माझ्याशीं जिव्हाळ्याचे संबंध होते. त्यामुळें माझीं विडंबनकाव्यें वाचून त्यांच्या भावना दुखूं नयेत आणि त्यांच्या माझ्या लोभांत अंतराय निर्माण होऊं नये अशी माझी मनापासून इच्छा होती. विडंबित कवींची टर उडवावी किंवा त्यांची फटफजिती करून त्यांना कवितेच्या क्षेत्रांतून उठवून लावावें असा कांहीं 'झेंडूचीं फुलें' लिहिण्यांत माझा हेतु नव्हता. सदर कवींच्या काव्यांतले मला वाटणारे दोष हंसत हंसत आणि गमती-जमतीनें त्यांच्या आणि वाचकांच्या निदर्शनाला आणावे आणि वाङ्मयांत एक नवी मौज निर्माण करावी, एवढाच माझा उद्देश होता. सामान्य वाचकांच्या आणि श्रोत्यांच्या दृष्टीनें तो माझा हेतु अपेक्षेपेक्षां यशस्वी झाला. पण विडंबित कवींचीं मनें न दुखावलीं जाण्याच्या बाबतींत मात्र मला तितकेसें यश आलें नाहीं. कांहीं कविमित्र माझ्यावर अतिशय रागावले आणि कांहींना मनापासून वाईट वाटलें. माधव जूलिअन्च्या बाबतींत माझ्याकडून एकच अपराध झाला. त्यांच्यावरील एका विडंबनांत त्यांना लागेल असा वैयक्तिक संदर्भाचा एकच शब्द होता. वास्तविक त्याची कांहीं आवश्यकता नव्हती; पण तो वापरण्याचा मोह त्या वेळीं मला कांहीं आवरतां आला नाहीं. 'झेंडूच्या फुलां'च्या पुढील आवृत्तींत मीं तो उल्लेख कटाक्षानें काढून टाकला. आणि जाहीर काव्यवाचनांत तर मी ती विशिष्ट ओळ कधींच वाचून दाखवीत नसें. तथापि त्यामुळें माधवरावांचें आणि माझें पुष्कळ दिवस वांकडें आल्यासारखें झालें होतें,

**सत्तावीस सालच्या मे महिन्यांत** श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या अध्यक्षतेखालीं

पुण्यामध्यें साहित्यसंमेलन भरलें होतें. त्या संमेलनांत जाहीर काव्यगायनाचा किर्लोस्कर नाटकगृहांत जो एक टोलेजंग कार्यक्रम झाला, त्यामध्यें 'झेंडूच्या फुलां' मधील पांचसहा कविता मीं वाचून दाखविल्या. अर्धा तासपर्यंत सारें नाटकगृह हंशा आणि टाळ्यांच्या कडकडाटानें अगदीं दणाणून गेलें. श्रोते माझ्या विडंबनकाव्यावर इतके बेहद्द खूष होऊन गेले कीं कांहीं विचारूं नका. लोकांनीं मला अक्षरशः अगदीं डोक्यावरच उचलून घेतलें. 'झेंडूच्या फुलां' चा महाराष्ट्रीय रसिकांनीं केलेला तो पहिला जाहीर सत्कार होता. आपल्या काव्यावर केलेल्या विडंबनाचें जाहीर वाचन महाराष्ट्र साहित्यसंमेलनामध्यें व्हावें आणि त्याचा एवढा गाजावाजा व्हावा ही गोष्ट 'रविकिरणमंडळा' च्या कांहीं सभासदांना मुळींच आवडली नाहीं. त्यांनीं संमेलनाचे अध्यक्ष तात्यासाहेब कोल्हटकर यांच्याकडे जाऊन हट्ट धरला कीं, या गोष्टींबद्दल तीव्र नापसंती त्यांनीं आपल्या उपसंहाराच्या भाषणामध्यें व्यक्त करावी. तात्यासाहेबांनीं ती गोष्ट मान्य केली. कारण 'रविकिरणमंडळां' तील काहीं सभासदांना तरी नाखूष करण्याचें मनोधैर्य तात्यासाहेबांजवळ त्या वेळीं मुळींच नव्हतें. आदल्या दिवशीं काव्य-गायनाच्या कार्यक्रमांत मीं विडंबनकाव्यें म्हटलीं, या गोष्टीची तात्यासाहेबांनीं आपल्या उपसंहाराच्या भाषणामध्यें अगदीं कडक शब्दांत निर्भर्त्सना केली. जवळ जवळ तो माझ्या 'झेंडूच्या फुलां' चा निषेध होता. विनोदाच्या बाबतींत जे माझ्या गुरूंचेही गुरू होते त्यांच्या तोंडूनच माझ्या पहिल्याचं विनोदी लेखनावर जाहीरपणें असा नापसंतीचा शिक्का बसावा हा योगायोग मोठा विचित्र होता! तात्यासाहेबांच्या तोंडून निघणारे कटु शब्द अगदीं चाबकाच्या फटकाऱ्याप्रमाणें माझ्या काळजाला झोंबले आणि माझ्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. पण तें दुःख मी मनांतल्या मनांत तसेंच गिळून टाकलें. कारण तात्यासाहेबांचें 'झेंडूच्या फुलां' वरील तें प्रतिकूल मत आज ना उद्यां बदलल्यावांचून रहाणार नाहीं, अशी माझ्या मनानें त्या वेळीं मला खात्री दिली. आणि पुढें तसेंच घडून आलें. कांहीं वर्षांनीं 'झेंडूच्या फुलां' वर तात्यासाहेबांनीं स्वहस्तानें विस्तृत अभिप्राय लिहून पाठविला आणि त्यांत माझ्या विडंबन-काव्याची त्यांनीं मुक्तकंठानें स्तुति केली. मात्र 'रविकिरणमंडळां' च्या सभासदांना वाईट वाटेल म्हणून त्या अभिप्रायाची मी कुठेंही वाच्यता करूं नये असें त्यांनीं मला बजावून ठेवलें. तात्यासाहेबांच्या स्वभावांतला तो 'विनोद' बघून मी त्या वेळीं पोटभर हसलों. पुढें कांहीं वर्षांनीं 'रविकिरणमंडळा' च्या सभासदांच्या मनामधली माझ्या-विषयींची अढीही उलगडून गेली. आणि 'झेंडूच्या फुलां' मधील विनोदाचा आस्वाद अगदीं निःसंकोचपणें आणि मनमोकळेपणानें घेण्यासारखी त्यांची

मनःस्थिति झाली. अनेक वेळां तर एकाच व्यासपीठावरून आम्ही सर्वांनीं आपापल्या कविता म्हणून दाखविलेल्या आहेत. मी केलेल्या विडंबनाबद्दल ज्यांचा मजवर राग राहिला आणि ज्यांनीं त्याबद्दल मला मुळींच क्षमा केली नाही, असे एकच कवि होते. ते म्हणजे प्रा. श्री. नी. चापेकर. प्रत्येक बारीक-मोठ्या लिखाणाच्या आणि व्याख्यानाच्या अखेरीस ज्ञानेश्वराचें 'पसायदान' आणल्यावांचून चापेकर कधींही रहात नसत. या त्यांच्या खोडीचें मी जेव्हां विडंबन केलें, तेव्हां एका व्याख्यानांत ते अतिशय संतापून म्हणाले कीं, "प्रत्येक वेळीं मी शेवटीं ज्ञानोबांचें 'पसायदान' आणतों म्हणून हा अत्रे माझी थट्टा करतो. मग 'पसायदान' म्हणायचें सोडून मी काय 'गॉड सेव्ह द किंग' म्हणूं म्हणजे या अत्र्याचा आत्मा संतुष्ट होईल?" चापेकरांना प्रत्येक शब्दामागें 'सत्' आणि 'सु'चें टोपण घालण्याचें विलक्षण वेड होतें. त्याचें मी 'सदंगीं माझ्या सत्कोट। सत्पगडीचा वर थाट' असें विडंबन केल्यामुळें ते माझ्यावर फारच भडकले! एकदां तर चापेकरांची मी फारच गंमत केली. पुण्याच्या 'नगर वाचनमंदिरां'त एका कोजागरीच्या रात्रीं 'मराठी काव्य' या विषयावर माझें व्याख्यान होतें. अध्यक्षस्थानीं स्वतः प्रा. चापेकरच होते. कारण ते वाचन मंदिराचेच अध्यक्ष होते. मी माझ्या व्याख्यानांत मराठी भाषेमधील निरनिराळ्या भिकार काव्यांचे नमुने सांगून श्रोत्यामध्यें भयंकर हंशा पिकवला. ते नमुने कोणाचे, तें मीं श्रोत्यांना मुळीं सांगितलेंच नाहीं. अध्यक्षीय खुर्चीवर प्रा. चापेकर भयंकर चेहरा करून बसले होते आणि मनांतल्या मनांत मजवर दांतओठ खात होते. कारण मी माझ्या व्याख्यानांत श्रोत्यांना सांगत असलेले भिकार कवितेचे बहुतेक सर्व नमुने त्यांच्याच काव्यामधले होते! पुढें शेवटीं शेवटीं तर चापेकर माझ्यावर इतके चिडले कीं, 'एकावली' नांवाच्या एका काव्यांत त्यांनीं मला 'डुक्कर' अशी शिवी हांसडली! चापेकरांच्या बाबतींत माझ्याकडेच बराचसा दोष येतो. मी त्यांच्यामागें एवढें हात धुऊन लागायला नको होतें. मी त्यांच्या दोषांकडे दुर्लक्ष करावयाला हवें होतें.

'झेंडूच्या फुलां'ना महाराष्ट्रांत जेवढी लोकप्रियता मिळाली, तेवढी कोणत्याही काव्यप्रकाराला आजपर्यंत मिळालेली नाहीं हें अगदीं सत्य आहे. 'झेंडूच्या फुलां'मुळें विडंबनाला मराठी वाङ्मयामध्यें स्वतंत्र स्थान मिळालें आणि त्या विषयावर गेल्या पंधरा-वीस वर्षांमध्यें अनेक विद्वानांनीं विवेचनात्मक लेख लिहून चर्चा केली. शाळेच्या आणि विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत विडंबनकाव्याचा शिरकाव झाला. मध्यंतरी कांहीं वर्षें तर विडंबनकाव्याला महाराष्ट्रांत असा पूर येऊन गेला कीं कांहीं विचारूं नका. तथापि श्री. अनंत

काणेकर आणि श्री. दत्तू बांदेकर यांच्याखेरीज विडंबन काव्यप्रकार माझ्या-नंतर कोणालाही विशेष साधलेला नाहीं असें माझें प्रांजल मत आहे. गद्य विडंबनें लिहिण्याचे बाबतींत श्री. पु. ल. देशपांडे यांनीं अलिकडे कौतुकास्पद यश मिळवलें आहे, हेंही मला या ठिकाणीं नमूद करावेसें वाटतें. अद्यापि विडंबनाचें रहस्य पुष्कळांच्या मुळीं ध्यानांतच आलेलें नाहीं. कांहींतरी अर्वाच्य विषय घेऊन अद्वातद्वा रचना केली म्हणजे विडंबनकाव्य होतें, अशीच बहुतेक 'विडंबन'कारांची समजूत दिसते. काव्यरचनेच्या तंत्रावर प्रभुत्व असल्यावांचून आणि काव्याच्या अंतरंगातल्या बारीक सारीक मख्ख्यांचें मार्मिक ज्ञान असल्या-खेरीज विडंबनकाव्य लिहितां येणें अशक्य आहे, हें फारच थोड्यांना माहित आहे. सर्कशीमध्यें विदूषक घोड्यावर बसण्याचें विडंबन करून जो हंशा पिकवतो, त्याचें एकच कारण म्हणजे तो स्वतः पट्टीचा घोडेस्वार असतो. स्वतः निर्दोष काव्य जो लिहूं शकतो, तोच दुसऱ्यांच्या काव्यामधल्या दोषांचें विडंबन करूं शकेल किंवा त्यालाच तसें विडंबन करण्याचा अधिकार पोहोंचतो. तथापि, विडंबनकाराच्या अंगांत एवढाच गुण असून भागत नाहीं. त्याच्या अंगांत तल्लख विनोदबुद्धि असेल तरच त्याला प्रभावी विडंबनें लिहितां येतील! विनोदबुद्धीच्या अभावीं विनोदी काव्य लिहिण्याचा प्रयत्न केला, म्हणजे तो किती कृत्रिम आणि हास्यास्पद होतो, हें ज्याला पहावयाचें असेल त्यांनीं माधव ज्युलिअन् यांचें 'नकुलालंकार' वाचून पहावें. 'झेंडूचीं फुलें' निर्माण होण्यास जी परिस्थिती कारण झाली ती लक्षांत घेतल्यावांचून विडंबनकाव्याच्या खऱ्या स्वरूपाचें आक-लन होणार नाहीं. विडंबनकाव्य हा एक वाङ्मयीन टीकेचा अत्यंत सुसंस्कृत आणि प्रभावी प्रकार आहे. विडंबनाचें हत्यार फार कौशल्यानें आणि कोमलतेनें वापरावयाला हवें. विडंबनकाराची वाङ्मयीन अभिरुचि फारच उच्च दर्जाची असावयास पाहिजे. सादर्यसमीक्षणाचें फारच सूक्ष्म सामर्थ्य त्याच्या अंगीं असावयाला हवें. ध्वनीच्या आणि अर्थाच्या अगदीं बारीकसारीक छटादेखील त्याच्या नजरेमधून सुटतां कामा नयेत. ज्या भाषेमधलें वाङ्मय अत्यंत प्रगल्भ आणि संपन्न आहे आणि ज्या भाषेच्या लोकांची वाङ्मयीन अभिरुचि अत्यंत उच्च दर्जाची आहे त्याच भाषेंत उत्तम गद्य व पद्य विडंबनें निर्माण होण्याची शक्यता जास्त आहे. इंग्रजी भाषेंत विडंबनवाङ्मयाचें केवढें तरी श्रीमंत दालन आहे! त्या वाङ्मयाचा अभ्यास करण्यासाठीं एका माणसाला आपला सर्व जन्म खर्च करावयाला पाहिजे. 'विडंबन' या शब्दाचा अर्थ 'हास्यास्पद नक्कल करणें' किंवा 'वेडावण्या दाखविणें,' असा होत असल्यानें आणि 'विडंबना'चें 'विटंबने'शीं अधिक साम्य असल्यामुळें सदर वाङ्मयप्रकार हा

अनिष्ट आहे असा सामान्य माणसाच्या मनावर एक संस्कार होत असतो. तो मात्र बरोबर नव्हे, असें मला या ठिकाणीं आग्रहानें सांगावयाचें आहे. 'विडंबन' ही संभावित साहित्यिकांनीं करण्यासारखी गोष्ट नाहीं, असाही त्या नांवावरून एक ध्वनि सूचित होतो, तोही पण भ्रामक आहे. कारण विडंबन हा विरोधी भक्तीचा एक प्रकार आहे. ज्या काव्याचें विडंबन करावयाचें किंवा ज्या कवीचें विडंबन करावयाचें तें काव्य आणि तो कवि लोकप्रिय असावयाला हवा. तरच त्याच्या विडंबनाचा आस्वाद वाचकांना घेतां येईल. मूळ काव्य जितकें प्रसिद्ध तितकी त्याच्या विडंबनाची गोडी अधिक. लुंग्यासुंग्या कवींचें किंवा काव्याचें विडंबन मुळीं होऊंच शकत नाहीं. आणि झालें तर तें वाचणार कोण आणि समजणार कोणाला ? 'रविकिरणमंडळां'तले कवि जर फाटकेतुटके असते आणि त्यांच्या काव्यांत गुणांचा लवलेश नसता, तर 'झेंडूच्या फुलां'ना महाराष्ट्रांत जी अपरंपार लोकप्रियता लाभली, ती मुळीं लाभलीच नसती. एकाद्या कवीचें विडंबन करणें म्हणजे त्याबद्दल अप्रत्यक्षपणें आदर व्यक्त करण्यासारखेंच आहे. विडंबन-काव्याचें हें स्वरूप एकदां लक्षांत आलें म्हणजे विडंबनकाराबद्दल कोणाचाही गैरसमज होणार नाहीं–वाचकांचा नाहीं आणि विडंबितांचाही पण नाहीं ! उलट विडंबनकार हा पुष्कळांना आपला उपकारकर्ताच आहे असें वाटेल !

मार्च १९४९ }
मुंबई }

**प्रल्हाद केशव अत्रे**

## झेंडूचीं फुलें : विविध आवृत्त्या

*पहिली* : संग्रा० व प्रका० दि. गं. केळकर, सारस्वत प्रकाशन मंडळ, पुणें, १९२५, मूल्य ४ आणे.

*दुसरी* : (केशवकुमारकृत) प्रका० अ. स. गोखले, झेंडू पुस्तक फार्मसी, पु० १ लें, पुणें, दसरा १९३०, मूल्य १० आणे.

*तिसरी* : प्रका० शि. ह. गद्रे, मे० दामोदर शिवराम आणि कंपनी, मुंबई, १९३५ (?), मूल्य १ रु.

*तिसरी* : प्रका० र. दि. देसाई, नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई, १९४७, मूल्य २ रु.

*चवथी* : पहावयास मिळाली नाही.

*पांचवी* : प्रका० सुधाबाई र. देसाई, नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई, १९४९, मूल्य ३ रु.

*सहावी* : प्रका० सुधाबाई र. देसाई, नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई, १९६५, मूल्य ३ रु.

*आठवी* : प्रका० वि. ग. परचुरे, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई, १३ ऑगस्ट १९७२.